मन एकाग्र व्हावे अशी श्रीमहाराजांजवळ प्रार्थना करून मी नाम घेत बसलो होतो!

पू. बाबा म्हणाले, नाम चांगले व्हावयास पाहिजे असेल तर संसारातून मन काढून पूर्ण शरण जाणे आवश्यक आहे. संसार करावाच लागेल; पण त्यात गुंतून राहू नका.

## |१४| (२४ जुलै १९८७)

आजच्या चर्चेत पू. बाबांनी नामाची महती सांगितली. त्याचा सारांश असा: ॐकार हा अनाहत नाद आहे. ते शब्दब्रह्म आहे. नादब्रह्म हे त्याच्या अलीकडे आहे. नाम घेतां घेतां वैखरीतून मध्यमेत व मध्यमेतून पश्यंतीपर्यंत म्हणजे नादब्रह्मापर्यंत व पुढे अनाहत नादापर्यंत जाऊन नंतर त्याच्याही पलीकडे साधक जातो. नाम भूताकाशातून चित्ताकाशात व तेथून पुढे चिदाकाशात उतरते. ह्या गोष्टी शब्दांनी कळणाऱ्या नाहीत. त्या अनुभवानेच कळतील.

नाम श्रद्धेने घ्यावे, नाम प्रेमाने घ्यावे. नाम व प्रेम एकच आहेत. हे जमण्यास चित्तशुद्धी झाली पाहिजे. चित्तशुद्धी विवेकाने व अभ्यासानेच होईल. ह्या सीमेपर्यंत प्रयत्न आवश्यक आहेत. त्याच्या पलीकडे गुरुकृपेनेच जाता येते. साधन करीत असतांना गुरुकृपा केव्हां होईल हे कोणी सांगावे? पण त्यासाठी शरणागती हवी.

स्त्री व पैसा यांचा अभिलाष एकवेळ प्रयत्नाने सुटेल, पण लौकिकाचा अभिलाष सुटणे फार कठीण आहे. काही नाही तरी मी साधन करतो याचे लोकांनी कौतुक करावे असे तरी वाटतेच. हे सोडले पाहिजे. त्याबरोबरच अंगी तितिक्षा बाणवली पाहिजे. सहनं सर्व दु:खानां अप्रतीकारपूर्वकम्। चिन्ता विलापरहितं सा तितिक्षा निगद्यते॥ असे श्रीमत्‌आद्यशंकराचार्यांनी विवेकचूडामणीमधे म्हटले आहे.

## |१५| (३१ जुलै १९८७)

पू. बाबा म्हणाले की 'सर्व धर्मान् परित्यज्य मां एकं शरणं व्रज।' ह्या गीतेतील श्लोकाप्रमाणे संसारातील सर्व गोष्टींमधून लक्ष काढून एका नामाचा ध्यास घेतला पाहिजे. गेल्या आठवड्यात त्यांना भेटावयाला आलेल्या श्रीमती

खांबेटे - द. पां. खांबेटे यांच्या पत्नींनी जे सांगितले ते पू. बाबांनी आज सांगितले.

श्री. खांबेटे व त्यांच्या पत्नी कान्हनगडला स्वामी रामदास यांच्याकडे जात असत. स्वामी रामदासांनी त्यांना त्रयोदशाक्षरी राम मंत्राचा अनुग्रह दिला होता. एक दिवस ते त्यांच्याशी बोलत बसलेले असतांना कोणीतरी स्वामींच्याकडे कशाची तरी किल्ली आणून दिली, तेव्हां काहीशा विनोदाने स्वामी रामदास खांबेटे ह्यांना म्हणाले, **'See, papa holds the key.'** पुन्हा म्हणाले, **Now your bogie is attached to papa's engine.**

खांबेटे म्हणत की स्वामी रामदासांचे आणि श्रीमहाराजांचे सांगणे अगदी एकसारखे आहे. शेवटची ७ वर्षे श्री. खांबेटे यांची दृष्टी गेली होती. त्यापैकी पहिली ४ वर्षे ते कोणाकडून तरी वाचून घेत असत. त्यांनी लिहावयास घेतलेली काही पुस्तकेही त्यांनी लोकांना मजकूर सांगून लिहवून घेतली व पूर्ण केली. शेवटची ३ वर्षे मात्र त्यांनी वाचून घेणे, डिक्टेशन देणे इत्यादी पूर्ण थांबविले. त्या ३ वर्षांत शरीरपीडा असूनही ते फक्त नामात शांत व समाधानी राहिले.

## ।१६। (४ सप्टेंबर १९८७)

जवळजवळ सगळा ऑगस्ट महिना पू. बाबा आजारीच होते. त्यामुळे बऱ्याच दिवसांनी नेहमीची साधक मंडळी जमलेली आहेत.

**पू. बाबा** : आपली श्रद्धा असतांनाही जितके नाम व्हावयास पाहिजे तितके ते कां होत नाही?

**साधक ग** : दृश्याची ओढ अद्यापि कमी होत नाही व परमात्मदर्शन हे सर्वोच्च मूल्य आहे असे वाटत नाही. सध्याचे दृश्यातील जीवन तसेच राहून तेही मिळावे असे वाटते. एकूण भ्रम असला तरी आमचे **playing safe** आहे. दृश्यात सुरक्षितता वाटते.

**साधक प** : दृश्यात जशा अनेक वस्तू आपण प्रयत्नाने मिळवू शकतो तशीच प्रयत्नाने ब्रह्मवस्तु प्राप्त होईल असा भ्रामक विश्वास आहे.

**साधक ब** : झोकून दिल्याखेरीज होणार नाही.

सुरुवातीला पू. बाबांच्या प्रकृतीबद्दल बोलणे झाले होते त्या संदर्भात उठतांना ते म्हणाले : सांगणारा असा पाहिजे की त्याला अनुभव असावा व

त्यामुळे ऐकणाऱ्याच्या मनामध्ये साधनाबद्दल उत्साह निर्माण झाला पाहिजे. ऐकणाऱ्यानेही नुसते कानाने न ऐकता हृदयाने ऐकले पाहिजे. यालाच ज्ञानेश्वर महाराज अवधान म्हणतात. मला सांगायची हौस आहे असे नाही. श्रीमहाराजांची आज्ञा म्हणून मी सांगतो. त्यांना ज्या दिवशी पुरे असे वाटेल त्या दिवशी ते माझे बोलणे बंद करतील. मी कशाला प्रकृतीची काळजी करू?

## |१७| (१८ सप्टेंबर १९८७)

आज पू. बाबांनी त्यांच्या नव्या 'प्रेमयोग'या पुस्तकाच्या प्रती आम्हां सर्वांना भेट दिल्या. दि. ८ ते १२ सप्टेंबर गोंदवल्याला नामसाधना अभ्यास शिबिर झाले. शिबिरात दुसऱ्या दिवशी पू. बाबांनी असा मुद्दा मांडला होता की परमार्थात पूर्वग्रहच नव्हे तर पूर्वपूर्वग्रहही नाहीसे झाले पाहिजेत. त्या संदर्भात त्यांनी विचारले की हे शक्य आहे काय?

चर्चेत एक मुद्दा असा आला की देहबुद्धी आहे तोपर्यंत पूर्वग्रह राहणारच. पण देहबुद्धी नाहीशी झालेले श्रीमहाराजही म्हणतात की 'मला श्रीमंतापेक्षा गरीब, विद्वानापेक्षा अडाणी व शहरापेक्षा खेडे आवडते. ही आपली माझी आवड मी सांगितली.' हा पूर्वग्रहच नाही कां? पूर्वग्रह चांगला किंवा वाईट असतो. पण सामान्यतः prejudice वाईट असतो.

दुसरे उदाहरण जे. कृष्णमूर्तींचे. माझ्या मृत्यूनंतर माझ्या ग्रंथांची स्पष्टीकरणे लिहू नका. समाधी वा पुतळे उभारू नका असे त्यांनी सांगितले. ते म्हणाले, I am just a passer by.! हा पण पूर्वग्रहच नव्हे कां?

चर्चेचा निष्कर्ष : पूर्वग्रह जाणे कठीण आहे. साधनाला पोषक तेवढे पूर्वग्रह राहू द्यावे. बाकीचे क्षीण वा नष्ट करण्याचा प्रयत्न करावा. विचाराने ते नाहीसे होतीलच असे नाही. कदाचित चिंतनाने ते बळकट होतील म्हणून त्यांच्याकडे दुर्लक्ष करावे. यासाठी प्रयत्न आणि सावधानता दोन्हींचीही आवश्यकता आहे.

## |१८| (२५ सप्टेंबर १९८७)

पू. बाबांना नुकतेच NASA मधील एक भारतीय शास्त्रज्ञ भेटले होते. त्यांनी १) देवाची कल्पना सत्य कशी मानावयाची आणि २) देव असला तर त्याचे स्वरूप काय आहे असे दोन प्रश्न विचारले होते. पू. बाबा म्हणाले की देव तर्काने सिद्ध करता येईलच असे नाही पण तो प्रतिभेने - Intuition ने

जाणता येईल. त्यासाठी विचारांचे वैफल्य पटून निर्विचार व्हावे लागेल. ईश्वर पाहणे या डोळ्यांना शक्य नाही. 'मी आहे' या भानाप्रमाणेच 'ईश्वर आहे' हे प्रतिभेने जाणवते. तो सत् आहे म्हणजे नाही असे नाहीच. तो चेतन व पूर्ण म्हणून आनंदमय आहे.

चर्चेत पू. बाबा म्हणाले, गोपींचे कृष्णावर प्रेम होते. तत्सुखे सुखित्वम्। असे प्रेमाचे लक्षण नारदांनी सांगितले आहे. आपणही श्रीमहाराजांना जे आवडते, ज्यामुळे त्यांना आनंद होतो तेच केले पाहिजे. ती गोष्ट म्हणजे अखंड नामस्मरण.

नाम म्हणजेच भगवंत अशी identity झाल्याखेरीज सर्वकाळ नामस्मरण होणार नाही. त्यासाठी total dedication पाहिजे.

## |१९| (१ ऑक्टोबर १९८७)

उद्या दसरा आहे म्हणून पू. बाबांकडे बरीच माणसे येतील व चर्चा करता येणार नाही म्हणून पू. बाबांनी आज यावयास सांगितले होते. त्यानुसार संध्याकाळी ६॥ वाजता गेलो. 'क' परगावी गेले आहेत. सुरुवातीला पू. बाबांनी रमणमहर्षींनी देखील नामाला किती महत्त्व दिले आहे ते वाचून दाखविले. स्वामी रामदासांनी अखंड रामनाम घेतले आणि हा मार्ग शंभर टक्के बरोबर आहे असे रमणांनी सांगितले.

**पू. बाबा** : रमणमहर्षींचे हे म्हणणे जर खरें वाटत असेल तर आपले नामस्मरण का होत नाही ?

**साधक ग** : दृश्य जगाइतकी नामाची सत्यता वाटत नाही. नाम आणि भगवंत एक आहेत असे ठसेपर्यंत अखंड नामस्मरण कठीण आहे. इंद्रियांद्वारा होणारा जगाचा बोधच खरा वाटतो.

**पू. बाबा** : असे जर आहे तर वैखरीने घेतलेले नाम खरें वाटले पाहिजे. कारण वैखरी दृश्यात येते. पण आपला अनुभव काय आहे ? आणखी असे की वैखरीतले नाम जसे दृश्यातले असूनही खरें वाटत नाही तसे आपण मरणार आहोत हे माहीत असूनही ते खरें वाटत नाही. आपण कोणत्याही क्षणी मरू अशी सतत जाणीव जागी राहिली तर जीवनाचा प्रत्येक क्षण नामात घालवण्यास मदत होईल.

**साधक ब** : नाम व भगवंत एक आहेत असे आपण ऐकतो तेव्हां सगुण साकार भगवंत आपल्या मनात येतो व तो आणि नाम एक कसे असे वाटते.

**पू. बाबा :** नाम आणि भगवंत दोन्हीही विचारापलीकडचे आहेत. वास्तविक नाम आणि भगवंत ह्या वेगळ्या concepts च नाहीत. निर्विचार अवस्थेत नाम होईल तेव्हांच नाम आणि भगवंत यांचे ऐक्य जाणवेल. नाम घेतांना मनात अनेक संकल्प उठत असतात ते थांबले पाहिजेत. वाचन, विचार करणे ह्यांपेक्षा नाम अवघड आहे कारण त्याला कसलीही उपाधी नाही. आपण उपाधींचा व्याप वाढवण्यात रमतो म्हणून कसेही होवो शक्य तितके नाम स्मरण करण्याचा निश्चय करावा. मग ते वैखरीने झाले तरी चालेल. असा निश्चय केल्याखेरीज आणि तो अंमलात आणल्याखेरीज साधनात पुढे पाऊल पडणार नाही.

**|२०|** (१६ ऑक्टोबर १९८७)

सुरुवातीला पू. बाबांनी श्रीमती पुपुल जयकर ह्यांनी लिहिलेल्या आणि नुकत्याच प्रसिद्ध झालेल्या जे. कृष्णमूर्ती यांच्या चरित्रातील काही भाग वाचून दाखविला. त्यांना दिसणारी visions, मैत्रेय बुद्धासारखा दिसणारा त्यांचा चेहरा, त्यांची देहाविषयीची अनासक्ती, थिऑसफिस्टांशी झालेले त्यांचे मतभेद इत्यादी.

**साधक ब :** रामकृष्ण व रमणमहर्षींशी तुलना केली तर साधन कालापासून शेवटपर्यंत परमेश्वराने त्यांचा देह फुलासारखा ठेवला.

चर्चेच्या ओघात 'ब' म्हणाले, अखंड नामस्मरण होण्यास सद्गुरूंची कृपा पाहिजे.

**पू. बाबा :** मुखात नाम येते ह्याचा अर्थ कृपा आहेच. नाम घेऊ लागल्यापासून आपली वृत्ती कशी व किती बदलली हे आत्मनिरीक्षण करावे.

**साधक प :** बाहेरचे आलंबन घेऊन चित्त एकाग्र करण्याचा प्रयत्न करण्यापेक्षा हृदयस्थ परमात्मा किंवा सद्गुरूंचे अनुसंधान ठेवणे चांगले.

**पू. बाबा :** सत्संगती सर्वात चांगली; पण ती मिळाली पाहिजे. प्रत्येकाचे गुरुपद कोणाकडे जावयाचे हे ठरलेले असते. आपल्याला ते कळत नाही पण सत्पुरुषांना ते दिसते. माझे लग्न झाले त्यानंतर माझे सासरे मला इंदूरच्या माधवनाथांकडे घेऊन गेले. हे योगी होते. सुरुवातीला त्यांच्याशी ज्ञानेश्वरीसंबंधी बोलणे झाले. माझ्या जावयावर अनुग्रह करा असे माझे सासरे म्हणाले तेव्हां माधवनाथ म्हणाले, 'अहो, हे आधीच मोठ्या पुरुषाला दत्तक गेले आहेत. आता आणखी अनुग्रह काय करावयाचा!'

## |२१| (३० ऑक्टोबर १९८७)

आज पू. बाबा विशेष प्रसन्न दिसत आहेत. साधक प प्रकृती ठीक नसल्यामुळे आज आलेले नाहीत. त्या संदर्भात पू. बाबांनी श्रीमहाराजांनी सांगितलेली काही घरगुती औषधे सांगितली व म्हणाले :

ही औषधे सांगतांना श्रीमहाराजांचा उद्देश प्रकृती ठीक नसली की साधन नीट होत नाही ते व्हावे हा होता. श्रीमहाराज म्हणत की आलेला आजार सोसणे हे सर्वात चांगले; पण औषध घ्यायचेच झाले तर ते साधे असावे. मागे एकदा माझ्या पोटाच्या डाव्या बाजूस ॲबसिस झाले होते. श्रीमहाराजांनी डॉ. पाथरकरांना सांगून इंजेक्शन देववून ते बरे करविले आणि म्हणाले की सध्या हे बरे झाले आहे पण चार-सहा महिन्यांनी पुन्हा होईल. आणि तसेच झाले! पुन्हा ॲबसिस झाले तेव्हा कॉलेजला सुट्टी होती. तेव्हा श्रीमहाराज म्हणाले की आता औषध नको, भोगून संपवा!

**साधक ब :** (पू. बाबांना उद्देशून) आता श्रीमहाराज दिसतात म्हणजे नेमके काय होते?

**पू. बाबा :** आंधळ्या माणसाला जवळ दुसरा माणूस आहे असे जाणवावे किंवा आपल्याला अंधाऱ्या खोलीत आपल्याशिवाय आणखी कोणीतरी माणूस असल्याचे जाणवावे तशी श्रीमहाराजांच्या अस्तित्वाची जाणीव होते. काही वेळा डोळ्यांनाही दर्शन होते, पण ते क्वचित. (आमच्यापैकी एकांना उद्देशून) तुम्ही मला भेटलात तेव्हां रामाचा मंत्र घ्यायला तुम्हाला सांगितले कारण तुमच्या मागे ती उपासना मला दिसली. (सर्वांना उद्देशून) लक्षात ठेवा, वासना नाहीशा झाल्याखेरीज परमार्थ नाही आणि त्या कमी व्हावयाला नामासारखे दुसरे साधन नाही. येथे साधन आणि साध्य एकच आहेत. श्रद्धेने आणि समजून नाम घेतले तर ते लवकर काम करते हे खरें; पण अद्यापि खरी श्रद्धा नाही किंवा चित्त एकाग्र होत नाही म्हणून नामच घ्यावयाचे नाही हा आत्मघात आहे. लक्षात ठेवा की Quantity leads to quality. सर्व वेळ इतके नाम घ्यावे की दुसऱ्या वृत्तीच उठणार नाहीत. सर्व वेळ सर्व जीवन नामाने भरून गेले पाहिजे. व्यावहारिक दृष्ट्या वेड लागले असे वाटावे इतके नाम घ्या. नाम घेता घेताच नामाचे प्रेम येईल. नामाचे प्रेम येण्यास नाथभागवत हा उत्कृष्ट ग्रंथ आहे असे 'क' म्हणाले.

## |२२| (६ नोव्हेंबर १९८७)

**पू. बाबा :** नाम म्हणजेच श्रीमहाराज वाटणे अवघड आहे पण आवश्यक आहे ते Feeling (भाव) आल्याखेरीज नामात रंगणे होणार नाही.

श्रीमहाराज म्हटले की त्यांचा देह दृष्टीसमोर येतो पण ते त्यापलीकडे आहेत. ते कसे आहेत ते जाणण्यासाठी आपली देहबुद्धी नाहीशी झाली पाहिजे आणि देहबुद्धी नाहीशी होण्यासाठी अखंड नामाचा अभ्यास केला पाहिजे.

**साधक प** : जेथून कोरा विचार होतो तेथून कोरे नाम का घेता येत नाही ?

**साधक ग** : श्रीमहाराज म्हणजे त्यांचा देह अशी आपली बळकट धारणा आहे. त्यामुळे concept च्या पातळीवर आपण महाराजांना जाणू शकत नाही. आज आपल्याला श्रीमहाराज 'होते' असे वाटते. ते 'आहेत' असे जेव्हां जाणवेल तेव्हां कोरे नाम येईल.

Quantity leads to quality ह्या मुद्दयाच्या संदर्भात पू. बाबांनी एक हकिगत सांगितली. शंकराचार्यांना (संकेश्वर मठ) गुरुदेव रानड्यांशी काही अध्यात्मिक चर्चा करावयाची होती. त्यांच्या निरोपावरून गुरुदेव त्यांना जाऊन भेटले. चर्चेच्या शेवटी शंकराचार्य गुरुदेवांना म्हणाले, माझे शंकासमाधान झाले पण आपणाशी आणखी बोलावे असे वाटते; आपण पुन्हा उद्या याल का ? यावर गुरुदेव म्हणाले की नामाने सोडले तर येईन. कारण पूर्वी नाम माझ्या ताब्यात होते, आता स्थिती अशी आहे की मी नामाच्या ताब्यात आहे !

## |२३| (१३ नोव्हेंबर १९८७)

पू. बाबांनी जे कृष्णमूर्तींचे The Future of Humanity नांवाचे पुस्तक दाखविले. ते म्हणाले की Future म्हणतांना कृष्णमूर्तींना psychological time अभिप्रेत आहे. Thought शब्दही त्यांनी जाणीव ह्या अर्थाने वापरला आहे.

मागच्या शुक्रवारी 'प' म्हणाले होते की आपले नाम महाराज ह्या विचारापर्यंत पोहोचत नाही. तसे ते पोहोचले तर चांगले नामस्मरण होईल. त्या संदर्भात पू. बाबा म्हणाले, वास्तविक नाम विचारापलीकडे आहे. त्यासाठी सद्गुरूंनी दिलेल्या नामावर श्रद्धा पाहिजे. ज्याने आपला हात माझ्या हाती दिला त्याचा हात मी रामाच्या हाती नेऊन दिला असे श्रीमहाराज सांगतात आणि ही आपली फार मोठी आशा (hope) आहे.

**साधक ब** : महाराजांच्या हाती आपला हात देणे म्हणजे आपले कर्तेपण विसरून सर्व काही त्यांच्यावर सोपविणे. हे धाडस आहे. त्याची अद्यापि तयारी नाही.

**साधक ग** : श्रीमहाराज आत्मदर्शन करवतील ह्यात शंकाच नाही. पण आपण ते ह्या जन्मीच झाले पाहिजे असे काळाचे बंधन घालतो ते बरोबर नाही. ह्या जन्माला काळाच्या ओघात तसे महत्त्व नाही. तथापि मानव देहातच साधन शक्य आहे ही जाणीव सतत ठेवून साधन केले पाहिजे. आत्मदर्शन ह्या जन्मी व्हावेसे वाटते पण त्यासाठी पराकाष्ठेचा अभ्यास हवा तोही आम्ही करीत नाही.

**पू. बाबा** : नामाचे obsession झाले पाहिजे. (येथे obsession हा शब्द निरोगी अर्थाने वापरला आहे. नामाने 'झपाटले' पाहिजे) त्यासाठी शरणागती पाहिजे.

**साधक प** : सर्व खटपटी करून शरण जावयाचे तर आधीच का शरण जाऊ नये?

**साधक क** : अशी शरणागती येत नाही. मी स्वत:ला फार प्रबळ आणि कर्तृत्ववान समजतो.

**पू. बाबा** : ह्यासाठीच सत्संगाचे व श्रवणाचे महत्त्व फार मोठे आहे. श्रवणासाठी कृष्णमूर्तींनी Listening असा शब्द उपयोगात आणला आहे.

**साधक प** : आपण जेव्हां ऐकत असतो तेव्हां त्यावर आपल्या प्रतिक्रिया उमटत असतात; त्या थांबल्या पाहिजेत. कृष्णमूर्ती क्वचितच दृष्टान्त देत. पण ह्या बाबतीत ते म्हणाले, Listening असे व्हावे की एखाद्या जलाशयात वरून खडा इतका अलगद पडावा की पाण्यावर एकही तरंग उठू नये, तसे श्रवणानंतर मनात कोणतेही तरंग उठू नयेत; नुसते ऐकावे.

**साधक क** : ज्ञानेश्वर महाराजांनी आणि एकनाथांनी ह्या अर्थानेच 'अवधान द्यावे' असे म्हटले असावे.

**पू. बाबा** : आपणांस ज्ञान व्हावेसे वाटते. पण ज्ञान व अज्ञान हे दोन्ही बंधच आहेत. आपणास त्या पलीकडे जावयाचे आहे. म्हणून मनाची व्यग्रता वाढेल असे वाचन करू नये.

## |२४| २० नोव्हेंबर १९८७

पू. बाबांनी An Invocation of the Name Christ - by an Eastern Monk हे पूर्वी वाचावयास दिलेले पुस्तक पुन्हा दाखविले. त्यातील काही भागावर चर्चा झाली. लेखक म्हणतो, Invocation is repetition of Name. ते घेतांना तुम्ही ख्रिस्ताच्या जीवनाचा विचार

करता, म्हणजे जणू लोलकातून त्याच्याकडे पाहता. त्याऐवजी नुसते नाम घ्या कारण ते भिंगासारखे आहे. त्यातून येणारे नामाचे किरण तुमचा अहं जाळून शुद्ध प्रकाश पसरवतील. नाम एकसारखे कंटाळवाणेपणे घेऊ नये. काही काळ नामस्मरण करून त्यावर चिंतन करा व असे चिंतन करतांना मन इतर विषयांकडे जाऊ लागले तर पुन्हा नामस्मरण सुरू करा. लेखकाने (घारीसारख्या) मोठ्या पक्ष्यांचे उदाहरण दिले आहे. हे पक्षी आकाशात उंच जाताना भरभर पंख हलवितात, पण त्यांना पाहिजे तितके उंचीवर गेले की तेथे पंखांची हालचाल थांबवून नुसते तरंगत राहतात, तसे नामात तरंगत रहा. उंची कमी झाली की पक्षी पुन्हा पंख हलवून वर जातात तसे चित्ताची एकतानता कमी झाली तर पुन्हा नामस्मरण चालू करा. पू. बाबा म्हणाले, ह्या स्थितीलाच महाराज 'नामात असणे' म्हणत. महाराजांनी सांगितलेले उपाधिरहित कोरे नाम ते हेच.

**साधक प** : तत्त्व म्हणून तरी आपण हे मान्य केलेच पाहिजे की अनुग्रह झाला तेव्हाच वासनांचा गुंता सुटायला सुरुवात झाली. तो जलद सुटावा म्हणून जास्त साधन केले पाहिजे.

**|२५|** (२७ नोव्हेंबर १९८७)

**साधक प** : कृष्णमूर्तींनी म्हटले आहे की एखादा माणूस मेल्यावर तुम्ही जे दु:ख करता त्या ऐवजी तो जिवंत असतांनाच तुम्ही त्याच्या मृत्यूची कल्पना केली तर पुढे त्याच्या मृत्यूचे दु:ख कमी होईल, नव्हे नाहीसे होईल. यालाच वृत्तिनिरोध म्हणावयाचे का?

**पू. बाबा** : पतंजलींनी विभूतिपादात 'संस्कार साक्षात्करणात् पूर्वजातिज्ञानम्।' असे सूत्र दिले आहे. चित्तात अनेक पूर्वजन्मार्जित संस्कार असतात. त्यांवर संयम केल्यास त्यांचे व Law of association ने पूर्वजन्मांचे ज्ञान होऊ शकते. चित्तवृत्तींच्या निरोधात संयम (सम्यग् यम) आहे. कृष्णमूर्तींचे म्हणणे बरोबर आहे.

साधनात आपल्या आड काय येते ह्यावर संयम केला तर तो अडसर दूर करणे शक्य होईल. हा विचाराचा मार्ग आहे. सर्वांना तो साधेल असे नाही. त्यापेक्षा सतत नामस्मरण करीत राहिल्यास वासना क्षीण होऊ लागतील व चित्त शुद्ध होऊन साधकाच्या नकळत साधनात येणारे अडथळे दूर होतील. अर्थात ह्यासाठी नामस्मरण करतांना शरणागतीचा भाव पाहिजे. श्रीमहाराज

म्हणत की ओढ्यात खरकटी भांडी भिजत घातली आहेत, एक हात फिरवला की स्वच्छ होतील. हे खरें, पण भांड्यांनी हालचाल न करता ओढ्याच्या पाण्यात भिजत पडले पाहिजे. (सद्गुरूंना शरण जाऊन साधनात राहिले पाहिजे.) भांडे जितके जास्त करवडलेले तितके ते जास्त वेळ पाण्यात ठेवावे लागेल. आपल्या चित्तात केवळ पूर्वग्रहच नव्हे तर पूर्वपूर्वग्रह असतात; ते नाहीसे झाले पाहिजेत.

**साधक ग** : हे सर्व कळते पण वळत नाही; कारण तळमळ नाही. ही तळमळ कशी निर्माण व्हावयाची?

**पू. बाबा** : एक तर संसारात संकटे येतील किंवा कृष्णमूर्तींनी म्हटल्याप्रमाणे simulated situation द्वारा त्यांचा विचार करून बंध तोडणे शक्य होईल व मग सद्गुरुकृपेचा ओघ येत नाही म्हणून तळमळ लागेल.

**|२६|** (७ डिसेंबर १९८७) (मार्गशीर्ष वद्य द्वितीया)

मुक्काम गोंदवले. पू. बाबांची खोली.

आज पुण्यतिथी उत्सवाचा दुसरा दिवस. कालच्या चर्चेत धर्म आणि अध्यात्म ह्यांचे स्वरूप स्पष्ट झाले होते. धर्म कालाबरोबर बदलतो, अध्यात्म बदलत नाही. आत्मस्वरूप जाणण्यास सद्गुरुशिवाय गती नाही. पण दृश्य जेवढे खरें वाटते तेवढे सद्गुरु खरें वाटत नाहीत, नाम तर नाहीच नाही. कालच्या ह्या चर्चेच्या संदर्भात राघवेंद्र स्वामी रामदासी ह्यांनी दासबोधातील पुढील ओव्या वाचून दाखविल्या. "देहबुद्धि केली बळकट। आणि ब्रह्म पाहों गेला धीट। तों दृश्यानें रुधिली वाट। परब्रह्माची॥ तेथें साच मानिलें दृश्याला। निश्चयोचि बाणोनि गेला। पहा हो केवढा चुका पडिला। अकस्मात॥" ६-८-४३,४४॥

**पू. बाबा** : नाम हे विचारांपलीकडे - बुद्धीपलीकडे आहे. नाम ही concept स्थिर झाल्याशिवाय अखंड अनुसंधान होणार नाही. नामाची संकल्पना, नाम म्हणजेच सद्गुरु ही भावना स्थिर झाली म्हणजे नाम टिकेल. आपले वाचन व पूर्वग्रह आडवे येतात. आपले चित्त म्हणजे ह्या पूर्वग्रहांचे एकावर एक घट्ट बसलेले थर आहेत; आणि अशा ह्या चित्तातून वृत्ती येतात. हे चित्त शुद्ध व्हावयास पाहिजे.

'अथातो ब्रह्मजिज्ञासा' ह्या सूत्रातील अथ ह्या पदाचे विवरण करतांना अथ म्हणजे साधनचतुष्टय संपन्न झाल्यानंतर असे श्रीमद्शंकराचार्यांनी म्हटले आहे. साधनचतुष्टय संपन्न व्यक्तीस ब्रह्म जाणण्याचा अधिकार आहे. नाम घेतांना श्रीमहाराज ह्यांपैकी काही सांगत नसत म्हणून एकदा त्यांना ह्याबद्दल विचारले तेव्हां ते म्हणाले की एखाद्या माणसाला लग्न कर म्हणून सांगितले की लग्नातले वेगवेगळे विधी कर असे सांगावे लागत नाही त्याप्रमाणे नामस्मरण करायला सांगितले की साधनचतुष्टय संपन्न हो असे वेगळे सांगावे लागत नाही. साधन चतुष्टयाचा हेतू चित्तशुद्धी हा आहे. त्यासाठी पुरुषप्रयत्न व शरणागती दोन्ही आवश्यक आहेत.

## |२७| (८ डिसेंबर १९८७)

उत्सवाचा तिसरा दिवस. गोंदवल्याची पू. बाबांची खोली.

उत्सवासाठी आलेल्या एका साधकाने सेवेविषयी पू. बाबांना विचारले.

**पू. बाबा** : तुम्ही म्हणता तशी समाजसेवा चांगलीच पण आपली चर्चेची सीमा - universe of discourse - सेवेचा म्हणजे गुरुघरच्या सेवेचा आध्यात्मिक फायदा काय ही असल्यामुळे केवळ तेवढेच पाहू. आपण सेवा कशाकरता आणि कोणाची करतो आहोत ह्याचे भान सुटता कामा नये. सेवेतून साधनाची प्रगती झाली पाहिजे. त्यामधून प्रेम आणि भक्ती वाढली पाहिजे. मग त्या सेवेचे स्वरूप काहीही असो. गुरूच्या अंगणातले खडे उचलून टाकले तरी ती सेवा होईल. सेवा ह्याचा पूजा असाही अर्थ आहे. भज सेवायाम्। आपल्याला सगुणातूनच निर्गुणात जाणे शक्य आहे. गुरूला आवडते ते करणे ही सेवाच आहे. आपल्या गुरूंना नामस्मरण आवडते; ते सतत करत राहावे.

श्रीमहाराजांबरोबर राहणे ही तारेवरची कसरत होती. कित्येकदा खूप धावपळ करावी लागे. रात्री जेवायला एक-दीड वाजत असे. एक जुनी आठवण पू. बाबांनी सांगितली. महाराज बिदरहळ्ळीला गेले होते तेव्हां रात्री अनेक लोकांच्या घरी जाऊन मुक्कामावर परत आले. त्यानंतर उशीरा एका गृहस्थाने त्यांना आपल्या घरी बोलाविले. बरोबर श्री. काशीकर होते. ते श्रीमहाराजांना म्हणाले की आता तात्या (पू. तात्यासाहेब केतकर) थकले आहेत. पण श्रीमहाराज म्हणाले, मला जाण्याचा उत्साह आहे. कारण भक्तांच्याबद्दल त्यांना करुणा होती. शेवटी तिकडे जावे लागले. परत आल्यावर रात्री साडेअकराच्या

पुढे जेवणे झाली! अशा भक्तांबद्दल करुणा असणाऱ्या गुरूंची आपण सेवा करतो आहोत हे भान सदैव हवे.

## |२८| (१२ डिसेंबर १९८७)

मुक्काम गोंदवले. पुण्यतिथी उत्सवाचा सातवा दिवस. पू. बाबांची खोली.

अखंड नामस्मरण करणे आपल्याला शक्य आहे का ह्याबद्दल चर्चा झाली. चर्चेचा समारोप पू. बाबांनी केला. ते म्हणाले :

नाम खरें वाटत नाही ते वाटावे यासाठी ॐकार किंवा नाम ही शक्ती आहे ह्यांचे स्मरण ठेवावे आणि त्या शक्तीलाच आवाहन करावे की सतत नामस्मरण करण्यास त्या शक्तीने मदत करावी. सगुणाच्या चिंतनापेक्षाही कदाचित हा मार्ग प्रभावी ठरू शकेल. स्वस्वरूपानुसंधान किंवा अंतर्बाह्य भगवंताचे भान येणे हेच प्रेम होय. प्रेमाने सतत नामस्मरण आणि सतत नामस्मरणामुळे प्रेम असा परस्पर संबंध आहे. जोपर्यंत नामस्मरण ही **supreme value** होत नाही तोपर्यंत सर्व खटपट लटकी आहे, तथापि हे **valuation** ही नामस्मरणानेच होईल. आता आयुष्याची अखेर जवळ आली असतांना तरी संसाराचे प्रेम सोडून नामस्मरण करा.

## |२९| (१४ डिसेंबर १९८७)

मुक्काम गोंदवले. पुण्यतिथी उत्सव नववा दिवस. पू. बाबांची खोली.

खोलीत जमलेल्या मंडळीपैकी एक डॉक्टर म्हणाले की त्यांनी आतापर्यंत शेकडो जणांचे मृत्यू पाहिले पण त्यांपैकी मालाडला रहाणाऱ्या एक बाई आणि एक सिंधी पेशंट अशी दोन माणसेच शांतपणे नाम घेत गेलेली पाहिली.

पू. बाबांनी श्री. दत्तोपंत गांधी नावाच्या साधकांच्या जीवनातील काही गोष्टी सांगितल्या. १) गांधी ह्यांना कॉलरा झाला तेव्हां कोणतेही औषध न घेता रामनामाने मंतरलेले पाणी ते घेत राहिले आणि बरे झाले! ताप आला तरी ते असेच करीत. ते म्हणत की रामनामाने शंकराचा विषदाह नाहीसा झाला तेथे साध्या तापाची काय कथा? २) मधुमेहामुळे त्यांचा एक डोळा गेला होता. गिरगावात रस्ता ओलांडतांना ते मोटारीसमोर आले तेव्हां साक्षात श्रीकृष्णाने त्यांना हात धरून बाजूला ओढले व तो नाहीसा झाला असे ते सांगत. ते म्हणत की त्या स्पर्शाची गोडी काही और होती. ते वारल्यानंतर त्यांचा मुलगा म्हणाला, 'माझे वडील एक संत, महात्मा होते,'

पू. बाबा म्हणाले, प्रकृती केव्हांही खालावेल, मृत्यूचा घाला कोणत्याही क्षणी येईल ह्याचे भान ठेवून आज आत्ता शक्य तितके जास्तीत जास्त नामस्मरण केले पाहिजे.

**साधक अ** : स्वामी रामदास म्हणत की परमार्थासाठी चार गोष्टी आवश्यक आहेत. त्यांना ते परमार्थ रथाची चार चाके म्हणत. ती अशी : १) अखंड रामनाम २) शरणागती ३) सत्संग ४) रामकृपा - राम कर्ता ही भावना.

## |३०| (१५ डिसेंबर १९८७)

आज उत्सवाचा दहावा दिवस. मार्गशीर्ष व. ९ ची वृद्धी झाल्यामुळे उत्सव ११ दिवस आहे.

साधक 'ब' आज मुंबईला परत जाणार आहेत म्हणून सकाळीच पू. बाबांना भेटावयाला गेले. त्यांच्याशी बोलताना पू. बाबा म्हणाले की श्री. आण्णासाहेब गाडगीळ नुकतेच कान्हनगडला गेले होते. माताजी कृष्णाबाईंना त्यांनी पुढच्या वर्षी येथे व्हावयाच्या अमृतमहोत्सवाची स्थूल योजना सांगितली. सर्व ऐकून त्या म्हणाल्या की हे बाहेरचे सर्व ठीक आहे पण अंतरंग विसरू नका. नामनिष्ठा आणि अखंड नामस्मरण राहिले तरच बाहेरच्या सर्व गोष्टींना किंमत.

## |३१| (१६ डिसेंबर १९८७)

उत्सवाचा अकरावा दिवस. गोंदवल्याची पू. बाबांची खोली.

पहाटे गुलाल उधळण्यापूर्वी पू. बाबांचे निरूपण झाले त्यावेळी थंड वारा लागल्यामुळे आणि दहा दिवसांच्या ताणामुळे पू. बाबांचा घसा बसला होता. त्यांनी तुकाराम महाराजांचा एक अभंग निवडून दिला व तो मोठ्याने वाचून त्याचा अर्थ सांगावा असे खोलीत जमलेल्या मंडळींना सुचविले. अभंग असा :

निर्वैर व्हावें सर्वभूतांसवें। साधन बरवें हेंचि एक॥ १ ॥
तरीच अंगीकार करील नारायण। बडबड तो शीण येणेंविण॥ २ ॥
सोईरें पिशुन समानचि घडे। चित्त पर ओढे उपकारी॥ ३ ॥
तुका म्हणे चित्त झालिया निर्मळ। तरिच सकळ केलें होय॥ ४ ॥

निर्वैर होणे ही साधनाची सुरुवात आहे की शेवट? निर्वैर होणे म्हणजे नेमके काय ह्याबद्दल चर्चा झाली. द्वेष दीर्घकाळ चालू राहिला व ज्याचा द्वेष वाटतो त्याचा नाश व्हावा असे वाटू लागले - इतकेच नव्हे तर त्या

चिंतनाबरोबर नाश करण्याचे प्रयत्न सुरू झाले की वैर दृढ होते. अहंकार आणि स्वार्थ हे वैराचे मूळ आहे.

## ।३२। (१७ डिसेंबर १९८७)

मार्गशीर्ष वद्य एकादशी. मुक्काम गोंदवले.

सकाळी साधक 'ग', 'क' आणि 'प' पू. बाबांना नमस्कार करण्यासाठी त्यांच्या खोलीत गेले होते. आज पू. बाबांचा घसा थोडा मोकळा झाला आहे.

**पू. बाबा** : काल रात्री तुम्ही मंडळी गेल्यानंतर निर्वैर म्हणजे काय यावर मी बराच विचार केला. पहाटे जपानंतर श्रीमहाराजांनी सांगितले की वैराचे मूळ स्मृतीमध्ये आहे. निर्वैर व्हावयाचे तर स्मृती नाहीशी झाली पाहिजे. भूतकाळाची स्मृती नाही, भविष्याचा विचार नाही, फक्त वर्तमानातच जो जगतो तोच निर्वैर होऊ शकेल. कालातीत झालो तरच निर्वैर होता येईल; कारण वैराचे मूळ देहबुद्धीत आहे.

पू. बाबांनी तुकाराम महाराजांचा आणखी एक अभंग काढून दाखवला.

बरवें बरवें। केलें विठोबा बरवें॥ १॥
पाहोनि बा अंत क्षमा। अंगीं कांटींवरी मारविलें॥ २॥
शिव्या गाळी नीत नाहीं। बहुफार विटंबिलें॥ ३॥
तुका म्हणे क्रोधाहातीं। सोडवूनी घेतलें रे॥ ४॥

मंबाजीने त्यांना काटेरी छडीने मारले. ते म्हणाले की त्यांचा क्रोध नाहीसा झाला आहे की नाही ह्याची श्रीविठ्ठलाने ही परीक्षाच घेतली.

**साधक प** : मंबाजीच्या ठिकाणीही तुकाराम महाराजांना श्रीविठ्ठलच दिसला ही शांतीची परिसीमा आहे. मारविले असे प्रयोजक आहे. म्हणजे घडणाऱ्या सर्व गोष्टींच्या मागे पांडुरंगाचा हात त्यांना दिसत होता.

**पू. बाबा** : मंबाजी दृश्य होता. त्याच्यामागे असलेले सूक्ष्म, तुकाराम महाराजांनी जाणले. अंतरंग सूक्ष्म झाले म्हणजेच बाह्य जगताच्या सूक्ष्म तत्त्वाची जाणीव होईल. ह्यासाठी राम कर्ता ही भावना बळकट करावी.

## ।३३। (२९ जानेवारी १९८८)

मागच्या शुक्रवारी मनाचे **stuff** म्हणजे द्रव्य काय असावे यासंबंधी चर्चा झाली. मन हे पूर्वस्मृती व कल्पनांनी भरलेले असले तरी ते त्यापासून बनलेले आहे असे नाही. मन स्थूल आहे आणि सूक्ष्मही आहे. बुद्धी मनापलीकडे आहे.

**पू. बाबा** : मन हा दृश्य जगाचा भाग आहे. ईश्वराने जग निर्माण करावयाचा संकल्प केला तेव्हां त्याच्यापासून माया, प्रकृती किंवा शक्ती निर्माण झाली. सर्व जगतात चेतना भरलेली असली तरी आपण सजीव व निर्जीव असा भेद करतो. सजीवात जाणीव असते असे म्हणतो. वास्तविक चेतना किंवा जाणीव सर्वव्यापी आहे. पण ही जाणीव जेव्हां देहाच्या खोळीत येते तेव्हां तिचे जे स्वरूप होते ते म्हणजे मन. म्हणून मन मायामय आहे.

मनापलीकडे बुद्धी आहे. ती निश्चयात्मक आहे. पण ब्रह्म बुद्धीच्याही पलीकडे असल्यामुळे ते बुद्धीने जाणणे शक्य नाही. म्हणून ही बुद्धीच्या पलीकडची उडी मारण्यास सद्गुरूची आवश्यकता आहे. सर्व साधने करूनही साधत नाही ही खात्री झाली म्हणजेच शरणागती येते.

**साधक ग** : माझ्यासारखा माणूस विचार करतो की आपल्या सांसारिक जबाबदाऱ्या पार पडल्यानंतर आपल्या जगण्याचा हेतू काय? ह्या प्रश्नाचे कोणतेही निश्चित उत्तर मिळत नाही. तुम्ही वारंवार सांगितलेले ऐकून नामासाठी जगतो असे उत्तर यावे असे वाटते पण ते उत्तर मिळत नाही कारण तशी कृती होत नाही.

**पू. बाबा** : तुम्ही हा प्रश्न स्वत:ला विचारीत असलात तरी ते विचारणे अगदी वरवरचे casual आहे. त्यात आवश्यक ती तीव्रता नाही.

**साधक प** : Still you are not seized with the problem. तसे झाले की तुम्हाला चैन पडणार नाही आणि मग जे काही असेल ते खरें उत्तर मिळेल.

## |३४| (५ फेब्रुवारी १९८८)

**पू. बाबा** : आपण स्वत:कडे साक्षीभावाने पाहणे चांगले आणि सोपे की परमात्मा साक्षीभावाने आपणाकडे पाहतो आहे असा भाव ठेवणे चांगले आणि सोपे? तुम्हांला काय वाटते?

**साधक ग** : साक्षीभाव म्हणजे नेमके काय?

**पू. बाबा** : साक्षीभावाने असणारा स्वत: कर्मात भाग घेत नाही. त्याला सर्व समजते पण तो फक्त पहात राहातो. तो झाडावरील दुसऱ्या पक्ष्यासारखा असतो.

**साधक प** : म्हणजेच साक्षीभावाने पाहणारा कर्ता नसतो. तेव्हां स्वत:कडे साक्षीभावाने पाहायचे असल्यास प्रथम 'मी' पुसला गेला पाहिजे; कारण आज

तरी मी मला साक्षीभावाने पहावयाचा प्रयत्न करावयाचा झाला तर माझेच दोन विभाग करतो.

**साधक ब** : अहंकार गेल्याशिवाय कर्तेपण जाणार नाही. ते गेले तरच राम कर्ता ही भावना दृढ होईल.

**साधक क** : पण आपण राम कर्ता म्हणू तेव्हां अर्थातच परमात्मा साक्षीभावाने असणार नाही. वास्तविक कर्तेपण आणि साक्षित्व ह्या एकाच सत्तेकडे भक्तीच्या व ज्ञानाच्या दृष्टीने पहावयाच्या पद्धती आहेत.

**पू. बाबा** : आपण द्वैतात राहतो. साक्षी म्हणून स्वत:कडे पाहण्याचा ज्ञानमार्ग आपल्याला कठीण वाटतो. त्यापेक्षा परमात्मा साक्षी आहे, तो माझ्या प्रत्येक कृतीकडे पाहतो असा भाव धारण करता आला तर हळूहळू सगळीकडे परमात्मतत्त्व ओतप्रोत भरलेले दिसू लागेल. प्रत्येक घटना ही नवी घटना, प्रत्येक दिवस हा नवा दिवस, इतकेच नव्हे तर प्रत्येक नाम हे नवे कोरे नाम आणि प्रत्येक दिवसाची झोप ही नवी झोप वाटू लागून आनंदाचा प्रत्यय येईल. आज स्वत:कडे कर्तेपण घेऊन आपण आपले जीवन सुखदु:ख मिश्रित आणि नीरस केले आहे. नामस्मरण करतांना परमात्म्याची-सद्गुरूंची- एकसारखी आठवण ठेवली तर प्रत्येक नाम हे नव्याने उसळून येऊ लागेल आणि तुकाराम महाराजांनी म्हटल्याप्रमाणे वाचा अनावर होईल. ह्यासाठी न कंटाळता उत्साहाने अभ्यास केला पाहिजे.

## |३५| (८ फेब्रुवारी १९८८)

आज पू. बाबांचा वाढदिवस. त्यांना ८० वे वर्ष लागले. दर शुक्रवारी जाणारे आम्ही संध्याकाळी ४ वाजता त्यांच्याकडे गेलो. बरीच मंडळी आलेली होती म्हणून पू. बाबांना नमस्कार करून निघावयाचे असे आम्ही ठरविले होते. पू. बाबा प्रसन्न दिसत होते. त्यांनी आम्हांला व श्री. बाबूराव व बाळाराव पणशीकरांना बसावयाला सांगितले.

**पू. बाबा** : स्थूलातून किंवा दृश्यातून सूक्ष्माकडे कसे जावयाचे?

सर्वजण गप्प राहिलेले पाहून ते पुढे बोलू लागले. ते म्हणाले, आपण नकळत स्थूलापेक्षा सूक्ष्माला, दृश्यापेक्षा अदृश्याला महत्त्व देतो. हे ऐकायला थोडे विचित्र वाटेल, पण माणूस बाहेरून चांगला दिसला तरी त्याचे अंतरंग जाणण्याचा आपला प्रयत्न असतो. त्याचप्रमाणे जीवनातली सर्व सुखे अपूर्ण असली तरी आपण त्यांच्यामागे लागतो कारण पूर्णामुळे अपूर्ण आहे. तथापि

अनेक अपूर्ण एकत्र करूनही पूर्ण होत नाही आणि पूर्ण हे पूर्णच असते. श्रीमहाराज म्हणत, तुम्ही वेड्यांचे इस्पितळ पहायला गेलात आणि तिथले शंभर वेडे लोक एकत्र केलेत तर त्यापासून एक शहाणा होणार नाही. अनेक अपूर्णातून पूर्ण मिळेल असे वाटणे हे वेड्यातून शहाणा मिळेल असे वाटण्यासारखे आहे.

आपले ध्येय निश्चित ठरत नाही हाच आपल्या उपासनेतील खरा अडथळा आहे आणि आपणच तो विचाराने आणि शरणागत बुद्धीने दूर केला पाहिजे.

ज्ञानाचा मार्ग आपल्याला साधणे शक्य नाही तेव्हां प्रेमाच्या किंवा भक्तीच्या मार्गाने अनुसंधान ठेवण्याचा प्रयत्न करावा.

## **| ३६ |** (१२ फेब्रुवारी १९८८)

**पू. बाबा** : गीतेत सांगितलेली धृति-सात्विक धृति म्हणजे काय?

धृ या धातूपासून धरून ठेवणे, चिकटून राहणे असा धृति शब्दाचा अर्थ होतो. बुद्धी निश्चय करते पण बुद्धीने निश्चय केल्यानंतर धृति म्हणजे धैर्य व धारणा नसेल तर त्या निश्चयाचे पर्यवसान निष्ठेच्या कृतीत होत नाही.

देव पाहिजे हा निश्चय झाला व त्यासाठी सतत नामस्मरण केले पाहिजे हे बुद्धीला समजले तरी धृति नसल्यामुळे नामस्मरण टिकत नाही. आमचे धैर्य कमी पडते त्यामुळे अनुसंधान टिकत नाही.

## **| ३७ |** (१९ फेब्रुवारी १९८८)

पू. बाबांनी सुरुवातीला भविष्यासंबंधी बोलणे काढले. ते म्हणाले, श्रीमहाराज म्हणत की ज्याच्यावर गुरुकृपा झाली त्याला सुखदु:ख नाही. मग त्याच्या भविष्यात काही का होईना?

**साधक प** : नामामुळे दृश्यात काहीतरी बदल व्हावयास पाहिजे असे वाटते. तथापि नामस्मरणाने मला काय पाहिजे ते समजत नाही. त्यामुळे साधन दृढ होत नाही.

**साधक क** : साधन कटाक्षाने केले पाहिजे. साधनात अहंकार नको. मी करतो म्हणून साधन होणार नाही. असे साधनासंबंधी अनेकांनी उलट सुलट सांगितले आहे त्यामुळे मनात फार गोंधळ होतो.

**साधक ग** : आज माझे सर्व व्यवहार अहंकारावरच आधारलेले आहेत. त्यामुळे 'राम कर्ता' हे माझ्या दृष्टीने नुसते शब्द ठरतात. तो भाव येत नाही.

अहंकार नाहीसा झाला तर 'मी' नाहीसा होईन अशी भीती वाटते म्हणून मी त्याला खतपाणी घालतो. मला वाटते, इतर व्यवहार करतांना जर अहंकार आहे तर साधन करतांनाही मी करतो, मी करणार असा अहंकार पाहिजे. साधन वाढले की साधनातील आणि जीवनातील अहंकार एकाच वेळी आपोआप कमी होऊ लागेल. बाकीचे सर्व व्यवहार मी करणार आणि साधन मात्र गुरुकृपेने व्हावे ह्या म्हणण्यात मला फसवणूक वाटते.

**पू. बाबा** : तुम्हाला तसे प्रामाणिकपणे वाटत असले तर अहंकाराने साधन करा. साधन करणे महत्त्वाचे आहे. साधन जसजसे वाढू लागते तसतसा सूक्ष्म देह काही काळ तरी स्थूल देहापासून बाजूला होऊ लागतो. साक्षित्व येते व त्याबरोबर शांतीचा, समाधानाचा अनुभव येऊ लागतो. आपण बरोबर रस्त्यावर आहोत याची ही खूण आहे. तथापि गुरुकृपा आहे म्हणूनच नाम घ्यावे असे वाटते हे विसरू नये. गुरु सूक्ष्मात शिरून स्थूलात बदल घडवून आणतात.

## | ३८ | (४ मार्च १९८८)

पू. बाबांनी दासबोध दशक ७, समास ७ 'साधन प्रतिष्ठा निरूपण'मधील काही भाग वाचून दाखविला आणि विचारले की आपणाला सात्विक धृति पाहिजे असे आपण म्हणतो पण द्रष्टा व दृश्य, ध्याता आणि ध्येय एकच आहे. ते बुद्धीच्या पलीकडे आहे. मग ते धृतीने कसे जाणावयाचे ?

**साधक प** : ह्या दशकात समर्थांनी म्हटल्याप्रमाणे साधनात विरोधाभास राहणारच. देहबुद्धी आहे तोपर्यंत मीपणानेच विचार होणार.

**पू. बाबा** : 'मी' कोण आहे.

**साधक ग** : ह्याचा दोन प्रकारांनी विचार करता येईल. (१) 'मी' कोण आहे ह्याचा शोध घेत जाणे हा झाला ज्ञानमार्ग, (२) 'मी' कोण आहे हे 'मला' माहीत नाही; पण मी अपूर्ण आहे. त्यामुळे माझे कर्तृत्व लटके आहे. वास्तविक 'राम कर्ता' आहे, हा भक्तिमार्ग.

**साधक प** : मी साधन करतो. साधन वाढावे असे वाटते पण ते घडत नाही. आता तुम्हीच सर्व काही करून घ्या अशी शरणागती येईल असे वाटते. सद्गुरूंच्या कृपेनेच नाम होते असे काही वेळा वाटते. पण तो भाव टिकत नाही. तेथे खरी धृतीची आवश्यकता आहे.

**पू. बाबा** : श्रीमहाराजांच्या कृपेने नामस्मरण होते हा भाव टिकला की नाम

जाणिवेपर्यंत पोहोचेल. नाम इतके घ्यावे की त्यामुळे वृत्ती सूक्ष्म बनली पाहिजे. नामाची चांगल्या अर्थाने बाधा (obsession) व्हावयास पाहिजे.

## |३९| (११ मार्च १९८८)

पू. बाबांनी दासबोधातील दशक १४, समास ८ मधील काही ओव्या वाचून दाखविल्या. ह्या समासात समर्थांनी अखंड ध्यान निरूपण केले आहे. ओव्या वाचल्यानंतर पू. बाबांनी विचारले की येथे श्रीसमर्थांना नेमके काय म्हणायचे आहे?

**साधक ग** : मला वाटते, ह्या ठिकाणी श्रीसमर्थांनी विशेषाकडून सामान्याकडे जाऊन सामान्याचे अखंड ध्यान करावयाला सांगितले आहे. आपण देवाऐवजी देवळाचे ध्यान करतो. आपल्या देहबुद्धीवर त्यांनी नेमके बोट ठेवले आहे.

**साधक प** : अखंड ध्यानात वृत्ती स्थिर राहिली पाहिजे.

**साधक ज** : माझा अनुभव असा आहे की एकाच वेळी नाम व दुसरा काही तरी विचार मनामध्ये चालू असतो.

**साधक प** : आपल्याला नाम अखंड चालू आहे असे वाटते पण ट्यूबलाईटचा प्रकाश अखंड वाटला तरी त्याचे जसे अतिशय जलद जाणे-येणे असते तसेच हे आहे. वृत्तींचा ओघ अखंड चालू असतो. पण एकच वृत्ती टिकून रहात नाही. ती टिकविण्याचा प्रयत्न केला पाहिजे.

**पू. बाबा** : नामाची अखंड धार पाहिजे म्हणतांना आपण ती पाण्याची धार न म्हणता तैलधार म्हणतो. कारण त्या धारेच्या अखंडतेत स्निग्धता आहे, तुटकपणा नाही. अशी अखंड धार शरणागतीशिवाय टिकणार नाही.

## |४०| (१ एप्रिल १९८८)

**साधक ब (पू. बाबांना)** : प्रकृती ठीक नाही काय? दाढी केलेली नाही म्हणून विचारले.

**पू. बाबा** : प्रकृती ठीक आहे. आज सकाळी उशीर झाला म्हणून दाढी केली नाही. नाहीतर जप राहिला असता. आणि आज कुठे बाहेरही जायचे नव्हते. जास्त वेळ जप झाला की मन प्रसन्न होते पण किडनीच्या त्रासामुळे पावलांवर सूज येते. मध्यंतरीच्या आजारात मृत्यूची भीती वाटत नव्हती आणि त्या आजारात जपही चांगला झाला. वास्तविक मृत्यू समोर दिसत

असतांनाही अनुसंधान टिकले पाहिजे. अजून श्रीमहाराजांना माझ्या हातून काम करून घ्यायचे आहे. एवढ्यात आटोपले असे वाटत नाही.

## |४१| (८ एप्रिल १९८८)

**पू. बाबा** : आपण 'राम कर्ता' म्हणतो म्हणजे आपल्याला नेमके काय अभिप्रेत असते? खरोखर आपल्याला तसे वाटते का? कर्तेपणासंबंधी आपली काय कल्पना आहे? 'मी' जसा कर्ता वाटतो तसे जे जे काही घडते त्याचा कर्ता राम आहे असे कां वाटत नाही? कर्तेपणात शक्ती असते. ती शक्ती म्हणजेच राम किंवा आपले सद्गुरु आहेत असा भाव का येत नाही?

**साधक प** : मी एकदा म्हणालो की तू 'सर्वकर्ता' आहेस हे मला पटवून दे. असे मी म्हणालो आणि माझे मलाच हसू आले. सर्वकर्त्याने मला पण निर्माण केले; त्याचे बारसे मी कसे पाहणार?

**साधक क** : सत्संगती, सद्ग्रंथ, पूजा, कीर्तन इत्यादींपैकी स्वत:च्या मनोरचनेप्रमाणे निवडून सतत भगवंताचे चिंतन केले तर 'रामकर्ता' भावाचा प्रत्यय येईल.

**पू. बाबा** : 'रामकर्ता' म्हणजे नेमके काय ते कळणे कठीण आहे. पण निदान जे घडते ते तुझ्या इच्छेने घडते असे म्हणावे. ते जास्त सोपे वाटेल.

**साधक क** : जे घडते ते आज कदाचित मला आवडणारही नाही. पण ते माझ्या हिताचे आहे असे वाटण्यासाठी तो दयाळू आहे, कृपाघन आहे अशी भावना सतत जागवली पाहिजे. ह्या बाबतीत स्वामी रामदासांचे आणि श्रीमहाराजांचे सांगणे अगदी सारखे आहे. ते सांगतात की नाम घेत राहिले, अखंड अनुसंधानात राहिले की सर्व गोष्टी साध्य होतील. 'रामकर्ता' या भावाचा प्रत्यय येईल.

## |४२| (१५ एप्रिल १९८८)

चर्चेसाठी पू. बाबांनी एकनाथ महाराजांचा एक अभंग घेतला होता. भाव असला तरच देव आहे, देव असला तर भाव आहे. तेव्हा आधी भाव की आधी देव? भाव म्हणजे तुम्हाला काय वाटते असे त्यांनी विचारले.

**साधक ग** : परमेश्वराच्या अस्तित्वासंबंधी दृढ श्रद्धा म्हणजे भाव.

**साधक प** : भाव ही नुसती संकल्पना (concept) नाही, त्यापेक्षा काहीतरी जास्त आहे. माझ्या अस्तित्वासंबंधी मला शंका नाही; हा भाव

आहे. मी आणि माझे अस्तित्व वेगळे नाही. तसे भगवंत आणि भाव वेगळे नाहीत. संकटाच्या वेळी किंवा मोठे काम असते आणि ते चांगल्या प्रकारे पार पडते तेव्हां हे माझे कर्तृत्व नव्हे, हे श्रीमहाराजांनी केले असे वाटते पण तो भाव, तो ताण (tension) गेला की नाहीसा होतो असा आपला सर्वांचा अनुभव आहे.

**साधक क** : ज्या प्रमाणात माझे कर्तृत्व नाही ह्याचा पावलोपावली प्रत्यय येऊ लागेल त्या प्रमाणात राम कर्ता हा भाव दृढ होईल. हे सर्व घडायला सत्संग हा खरा मार्ग आहे.

**साधक ब** : आम्हाला जे अस्तित्वात आहे त्या दृश्यासंबंधी भाव आहे, इतकेच नव्हे तर तो अनेक ठिकाणी misplaced आहे.

**साधक ग** : हा misplaced भाव केवळ नामानेच displace करता येईल पण त्यासाठी नाम जाणिवेपर्यंत पोचले पाहिजे.

**पू. बाबा** : हे खरे आहे. तथापि आज आपली जितकी शक्ती आहे तितकेच नाम आपण घेऊ शकतो, ते वाढण्यासाठी बाकीच्या गोष्टी कमी करून, काही गोष्टी सोडून आणि योग्य तो आहार घेऊन नामस्मरण वाढवीत राहिले पाहिजे.

## |४३| (२२ एप्रिल १९८८)

पू. बाबांनी ब्रदर लॉरेन्सच्या पत्रांचे मराठी भाषांतर वाचून दाखवले. काही भाग वाचून झाल्यावर ते म्हणाले, ब्रदर लॉरेन्स म्हणतो की भगवंत सर्वत्र आहे हा भाव निर्माण होण्यास, त्याच्या कृपेमुळे माझे जीवन चालले आहे आणि त्याच्या कृपेशिवाय मी जगणे शक्य नाही अशी खात्री झाली पाहिजे. ही खात्री जोपर्यंत होत नाही तोपर्यंत भाव निर्माण होणार नाही. आपल्याला असे कां वाटत नाही ?

**साधक प** : ह्याचे कारण माझा देहभाव हे आहे. मी सर्वकाळ मला म्हणजे माझ्या देहाला आणि मनाला जपण्याचा प्रयत्न करतो. त्यासाठी पैसा लागतो इतर माणसांची संगत लागते. पण श्वास घेता आला नाही तर जसे गुदमरते तसे नाम घेतले नाही तर गुदमरून जीव कासाविस होत नाही. असे जेव्हां होऊ लागेल तेव्हांच त्याच्या कृपेनेच मी जगतो आहे असे वाटू लागेल. कदाचित जीवनाची अशाश्वतता पटली तर असे वाटू लागेल.

**पू. बाबा** : नाम जोपर्यंत पश्यंतीपर्यंत पोचत नाही तोपर्यंत नामाची गोडी लागली असे म्हणता येणार नाही.

**साधक प** : आम्हाला परमार्थ साधत नाही कारण त्याच्याआड आम्ही स्वतःच येतो आहोत. स्वामी रामदासांप्रमाणे घरदार, लोकलाज सोडून जो रामवेडा होईल त्याला परमार्थ कां साधणार नाही?

## |४४| (२९ एप्रिल १९८८)

आज नेहमीच्या साधकांखेरीज पुण्याचे प्रा. भाऊसाहेब परांजपेही आलेले आहेत.

पू. बाबांनी "सांठविला हरि जीहीं हृदयमंदिरीं" अशी सुरुवात असलेला तुकाराम महाराजांचा एक अभंग वाचला आणि विचारले,

हरी साठवावयाचा म्हणजे काय? आणि हृदयात साठवायचा म्हणजे त्यामध्ये स्थल आणि काल त्या दोन्ही संकल्पना येतात.

**साधक ब** : हृदयात दृश्य जग, संसार भरलेला आहे तो बाहेर काढल्याशिवाय हरीला हृदयात जागा होणार नाही.

**साधक ख** : हरी हृदयात आहेच. त्याच्यावरचे सांसारिक सुखदुःखाचे दडपण बाजूला करायला हवे.

**साधक ग** : हरी हा स्थलकालाच्या पलीकडे आहे. तेव्हां हे साठवणे अलंकारिक आहे. इतर गोष्टी बाजूला सारल्या की तो चित्ताकाशात साठवलेलाच आहे.

**साधक प** : पण विठ्ठल बरोबर राहतो अशी तुकारामांची अनुभूती आहे. तेव्हा स्थलकालातीत हरी आणि सगुण हरी यांची सांगड कशी घालायची?

**श्री. परांजपे** : आधी हरी हृदयात स्थापन झाला की हळूहळू जाणिवेचा (consciousness) विस्तार होऊ लागेल व मग सर्वांभूती हरी दिसेल. तो बरोबर राहतो अशी जाणीव होईल. हे सर्वकाही नामानेच होईल. माझे थत्ते नांवाचे एक इलेक्ट्रिकल एंजिनिअर मित्र आहेत. वीस वर्षे इंग्लंडमध्ये मार्कोनी रेडिओमध्ये नोकरीला होते. त्यांनी आळंदीला मला एक प्रयोग करून दाखवला. आम्ही दोघे एका झाडाखाली बसलो होतो. दूरवर एक कुत्रे बसले होते. थत्त्यांनी कोणतेही शब्द उच्चारले नाहीत किंवा इशारा केला नाही तरीदेखील जागचे उठून ते कुत्रे थोडा वेळ त्यांच्याजवळ येऊन थांबले आणि परत गेले. हे कसे घडले म्हणून मी विचारल्यावर ते म्हणाले की मी येथून त्या

कुत्र्याकडे प्रेमाची जाणीव पाठवली होती. जाणिवेचा अशा प्रकारे विस्तार करता येतो.

**साधक क** : सत्संग आणि सद्ग्रंथ यांच्यामुळे साधनात प्रगती होऊन हरी हृदयात भरेल. आम्ही तासभर नाम घेतो व उरलेले तेवीस तास संसाराचे चिंतन करतो मग तो हरी हृदयात कसा भरणार? संसाराच्या उघड्या तोट्यांमधून तासाभरात भरलेले पाणी वाहून जाते.

**पू. बाबा** : नाम चांगले चालले आहे याचे काही गमक सांगता येईल काय?

**श्री. परांजपे** : मी गोंदवल्यास असतो तेव्हा माझे नामस्मरण अगदी सावकाश होते. कशाप्रकारे व किती वेगात नाम घेतले तर आनंद वाटेल याची प्रत्येकाची Frequency वेगळी असू शकेल. मला मात्र अर्धा तास ते तीन तासपर्यंत सावकाश नाम घेतांना अतिशय आनंद वाटतो. काही वेळा दुसरा कोणीतरी नाम घेतो आहे आणि आपण नुसते ऐकत आहोत असा भाव निर्माण होतो.

**पू. बाबा** : समाधानात वाढ आणि संसाराची आसक्ती कमी होऊ लागणे हे नाम चांगले चालले आहे याचे गमक म्हणता येईल. हृदयात विठ्ठल कसा भरावा हे 'बोलावा विठ्ठल पहावा विठ्ठल' या अभंगात तुकाराम महाराजांनी सांगितले आहे. अखंड नामस्मरण आणि त्यात भगवंताचे चिंतन म्हणजे जाणीवपूर्वक नामस्मरण केले तर हे शक्य आहे. नित्यानित्यविवेक करून अनित्य बाजूला सारण्यासाठी साधकाने सतत जागरुक राहिले पाहिजे. अहंकार नाहीसा झाल्याशिवाय खरे साधन होणार नाही.

## |४५| (१० जून १९८८)

पू. बाबांनी Max Plank ह्या जर्मन फिजिसिस्टचे चित्र दाखवले व त्याच्याबद्दल काही माहिती सांगितली. त्याचे वर्णन करताना लेखकाने म्हटले आहे की He was haunted with the problem even in his sleep. नामाच्या बाबतीत आपले असे का होत नाही?

**साधक प** : कोणत्याही समस्येवर विचार करू लागले की अशी स्थिती होते हा संशोधन करणाऱ्यांचा अनुभव आहे.

**साधक** : बुद्धिबळाचे प्राब्लेम सोडवतानाही असे होते.

**साधक प** : नामाच्या बाबतीत तसे घडत नाही कारण अजूनही आम्हाला

तो problem झालेला नाही. अद्यापि त्याची आच वाटत नाही. दुसरे असे की जीवनात मी वेगळा राहून अनेक गोष्टी मिळवण्यासाठी धडपड करतो तशीच नाम घेण्याची वेगळेपणाने खटपट चालू असते. वास्तविक नाम आणि मी वेगळे राहू शकत नाही, नव्हे, 'मी' नाहीसा झाल्याखेरीज खरें नाम होणार नाही.

**पू. बाबा** : काही वेळा असा अनुभव येतो की नाम म्हणजे एक फार मोठी शक्ती माझ्याजवळ आहे.

**साधक** : नुकतेच केदारनाथला पायी चढून जातांना आणि दुसरे दिवशी उतरतांना श्रीमहाराज बरोबर आहेत, ते मला नेऊन आणताहेत असा भाव होता. पण नंतर तो टिकला नाही. वास्तविक आपला प्रत्येक क्षण, प्रत्येक श्वासोच्छवास त्यांच्या सत्तेनेच चालतो. पण आतून असे वाटत नाही. फक्त आपल्या आवाक्याबाहेरच्या प्रसंगात त्यांची आठवण होते; आणि तसे आवाक्याबाहेरचे प्रसंग कोणते तेही आपणच ठरवतो.

**साधक प** : नामाच्या शक्तीचा थोड्या फार प्रमाणात आपणा सर्वांनाच अनुभव आहे. पण तो टिकत नाही. आपण तासभर नामाबद्दल बोलू शकू पण एकसारखे नाम टिकत नाही.

**साधक क** : सगुणोपासनेने हे शक्य होईल. भगवंताचे भजन-पूजन, चरित्र, लीलांचे वाचन इत्यादींमुळे सगुणाचे प्रेम निर्माण होईल आणि मग अनुसंधान टिकेल.

**पू. बाबा** : विचाराने अनुसंधान टिकवण्याच्या प्रयत्नापेक्षा हे सोपे व शक्य आहे. आपण नाम घेतो ते क्रमसंगत व कालामध्ये घेतो. ह्या दोहोंच्या पलीकडे ते गेले पाहिजे. 'मी' या भावाला क्रम आणि काल नाही. ते केवळ भान आहे. तसे नाम झाले पाहिजे.

**साधक ज** : काही वेळा नाम घेतांना आपण नामाला गोंजारत आहोत असे वाटते पण हा भावही फार थोडा वेळ राहतो.

**पू. बाबा** : खान अब्दुल करीम खान सुरांबद्दल असेच म्हणत. फैयाज खानही वरचा आणि खालचा सूर लावताना आपण सुरांशी खेळतो असे म्हणत. नाम हे सूक्ष्म आहे. देहभान नाहीसे झाल्याखेरीज ते मुरत नाही. 'येणें सोसें मन झालें हांवभरी। परती माघारी घेत नाही॥' अशी स्थिती झाली पाहिजे.

## ।४६। (१७ जून १९८८)

नेहमीप्रमाणे आम्ही पू. बाबांना नमस्कार करून बसलो. आज ते खूप प्रसन्न दिसताहेत.

पू. बाबांनी Evlyn Underhill च्या Worship पुस्तकातील Sacrifice च्या (यज्ञाच्या) अर्थासंबंधीचा एक उतारा वाचून दाखवला. तिने ख्रिस्तासाठी तीन यज्ञ सांगितले आहेत.

1) Total sacrifice of the self which is wholly accepted by Him.

2) Establish Communion with Him.

3) Offering to Him, which then accept as His Flesh and Blood.

**पू. बाबा** : सगुण भक्ती करताना पूजा अशी झाली पाहिजे. नित्यपूजा हा यज्ञ झाला पाहिजे. श्रीमहाराज म्हणाले, पूज्य भावाने पूजा करावी; म्हणजे आपण पुज्य-शून्य झाले पाहिजे. मी पणाचा पूर्ण नाश झाला पाहिजे. अशी पूजा-भक्ती का निर्माण होत नाही?

**साधक प** : आपण आप्तवाक्य मानतो. मी रेगनला (अमेरिकेचा सध्याचा प्रेसिडेंट) पाहिलेले नसूनही, लोक सांगतात म्हणून तो आहे यावर माझा विश्वास बसतो. पण सत्पुरुषांनी श्रीमहाराज आहेत, आजही आम्ही त्यांना पाहतो असे सांगितले तरी त्यावर विश्वास बसत नाही. येथेच काहीतरी गफलत आहे. म्हणून खरी श्रद्धा निर्माण होत नाही.

**साधक ग** : आपण Physical aspect ला (दृश्याला) महत्त्व देतो. आणि त्या अर्थाने महाराज 'होते' म्हणतो. त्यामुळे रेगन physically (देहाने) आहे तसे श्रीमहाराज आहेत असे वाटत नाही. उद्या रेगनचा मृत्यू झाला व त्यानंतर काही लोक आज आम्ही त्याला जिवंत पाहिला असे म्हणाले तर त्यावर आपण विश्वास ठेवणार नाही. तसेच हे आहे. जोपर्यंत स्थूल देहापलीकडे जाण्याची, त्यापलीकडे पाहण्याची आपली पात्रता नाही तोपर्यंत देहाने गेले तरी श्रीमहाराज आहेत हे आपणास 'पटत' नाही. अंडे उबून फुटण्यास जसा विशिष्ट कालावधी व तापमान लागते तसे विशिष्ट अवस्थेपर्यंत साधन झाल्याखेरीज ही दृष्टी येणार नाही.

**साधक क** : सगुण भक्तीचे, सद्ग्रंथामुळे व सत्संगाने पोषण होते.

**पू. बाबा** : त्या दृष्टीने पाहता आपण जी चर्चा करतो ती फुकट जात नाही - नव्हे ती आवश्यकच आहे. कारण साधन समजून करावे. आपल्या पुष्कळ समजुती भ्रामक असतात. विचाराला साधनाची जोड पाहिजे आणि साधन करतांना चित्तशुद्धी होण्यासाठी आपल्या आड काय येते याचाही विचार करून ती आडकाठी दूर करण्याचा प्रयत्न केला पाहिजे.

**साधक प** : ही अडचण व्यक्तीगणिक भिन्न असेल.

**पू. बाबा** : असे जरी असले तरीदेखील पैसा, मान, कामवासना इत्यादी त्या अडचणींचे सामान्य स्वरूप लक्षात घेता येईल. आणि ते लक्षात आले की अखंड सावधानता ठेवून साधन करावे लागेल.

**साधक ब** : अंधारात शब्द ऐकू आला की माणूस दिसला नाही तरी तो आहे ही खात्री होते तशी तरी श्रीमहाराजांच्या अस्तित्वाची खूण पटावी.

**पू. बाबा** : नामस्मरण करीत राहावे. त्यातूनच पुढचा मार्ग दिसेल.

## ।४७। (२४ जून १९८८)

**पू. बाबा** : नाथभागवतात मूळ भागवतातील पिंगला वेश्येची कथा सविस्तर दिलेली आहे. एका रात्री कोणीच गिऱ्हाईक आले नाही. वाट पाहून ती कंटाळली व तिच्या मनात विचार आला की ज्याची वाट पहावयाची त्यालाच विसरून मी परपुरुषाची वाट पहात आहे. असा अनुताप झाला आणि ती भगवत्‌चिंतनात मग्न झाली. ती म्हणते की ज्याअर्थी मला अनुताप झाला त्याअर्थी मागील जन्मात मी काहीतरी सत्कृत्य केले असले पाहिजे. पण पुन्हा तिच्या मनात विचार आला की जर मागच्या जन्मात सत्कृत्य केलेले असते तर ह्या जन्मी वेश्यावृत्ती का करावी लागली असती? तेव्हा परमेश्वराकडे चित्त गेले ते केवळ त्याची कृपा झाली म्हणूनच.

आपले साधन चांगले होण्यासही परमेश्वराच्या कृपेचीच जरूर आहे आणि ती कृपा होण्यासाठी पिंगलेसारखी शरणागती पाहिजे.

आपणाला 'काही होणे' माहीत आहे का? कारण आपण जप करतो आणि तो चांगला 'व्हावा' असे म्हणतो.

**साधक ग** : आपण role playing (वेगवेगळ्या भूमिका) करीत असतो. ऑफिसात ऑफिसर असतो. वर्गात विद्यार्थी किंवा प्रोफेसर असतो. घरी आलो की बाप, नवरा, भाऊ इत्यादी होतो.

**पू. बाबा** : लग्न झाले की लगेच बायको किंवा नवरा होतो.

**साधक प** : मी रागावतो तेव्हा खरा रागरूपच झालेला असतो.

**पू. बाबा** : एवंच 'काहीतरी होणे' आम्हाला माहीत आहे. पण हे सर्व 'होणे' स्थूलातील किंवा द्वैतातील आहे. 'देव पहायासी गेलो। देव होऊनीया ठेलो॥' असे होत नाही. म्हणून द्वैतातला सगुणाला शरण जाण्याचाच अभ्यास करायला हवा. केवळ रामकर्ता असे बोलून उपयोग नाही. प्रत्येक गोष्ट त्यांना सांगून, त्यांना विचारून करावयास हवी. ही सवयच लावून घेतली पाहिजे. वास्तविक आपले कर्तेपण लंगडे आहे हे पटूनही आपल्या हातून हे होत नाही. वृत्तीतून कृती झाल्यावर मग पत्ता लागतो की जे नको ते आपण केले. श्रीमहाराजांना सांगायचे विसरलो. म्हणूनच वृत्तीपर्यंत नाम व शरणभाव गेले पाहिजेत.

## ।४८। (१ जुलै १९८८)

पू. बाबांनी श्रीज्ञानेश्वरांचा एक अभंग चर्चेसाठी घेतला.

सगुणाची सेज निर्गुणाची बाज। सावळी विराजे कृष्णमूर्ति॥ १॥
मन गेलें ध्याता कृष्णचि नयनीं। नित्यता पर्वणी कृष्णसुखें॥ २॥
हृदय परिवारीं कृष्ण मनोमंदिरीं। आमुच्या माजघरीं कृष्ण बिंबें॥ ३॥
निवृत्ति निघोट ज्ञानदेवा वाट। नित्यता वैकुंठ कृष्णसुखे॥ ४॥

निवृत्ति निघोट ज्ञानदेवा वाट - निवृत्तिनाथांनी ज्ञानदेवास कृष्णरूप होण्याची श्रेष्ठ वाट दाखवली, किंवा परिपूर्ण निवृत्ति ही कृष्णभेटीची वाट ज्ञानदेवांना मिळाली.

**पू. बाबा** : निर्गुणाच्या आधाराने सगुण आहे. त्याची गोडी लागली पाहिजे. आपणाला कोणावरच सर्वस्व ओतून प्रेम करणे माहीत नाही.

**साधक प** : ही अंतर्यात्रा करावयास लागणारे मन तयार केले पाहिजे. आज माझे माझ्यावरदेखील प्रेम नाही कारण माझे माझ्यावर प्रेम असते तर निवृत्ती आली असती. दृश्याची खेच वाढली नसती.

**पू. बाबा** : संसारातील मन काढल्याखेरीज परमार्थ साधणार नाही.

## ।४९। (२२ जुलै १९८८)

पू. बाबांनी गुरुदेव रानडे यांच्या 'परमार्थ सोपान' या पुस्तकातील मीराबाईचे एक पद वाचले. ती म्हणते की नामदेव, मुक्ताबाई, कबीर यांच्याप्रमाणे मी ईशप्रेमात बुडून गेले व अशा रीतीने 'बनत बनत बनी आयी'

व शेवटी 'ज्योतसे ज्योत मिलायी'. पू. बाबा म्हणाले, मीराबाईने आपला अनुभव सांगितला आहे. मग आपले काय चुकते?

गुरुदेव रानडे पुढे म्हणतात : **God-seeking is a tortuous path and can be reached very slowly. Scienitists say that Himalaya grows two feet every year. Devotion grows slower than it.**

**पू. बाबा** : वास्तविक अनुग्रह घेतला की सर्व काही गुरूवर सोपवून देता आले पाहिजे. व्यवहारात आपल्याला तशी सवय आहे. ऑर्डर निघाली की लगेच आपण 'साहेब' होतो. माळ घातली की लगेच नवरा किंवा बायको होतो. मग येथेच घोडे कोठे अडते?

**साधक ग** : या दोन्ही उदाहरणात आम्हाला ओढ आणि आवड असते. परमार्थ हवाच अशी आम्हाला तळमळ नाही.

**पू. बाबा** : आता तळमळ वाटणार नाही तर केव्हां वाटणार? आपणच एकसारखे मनाला बजावून योग्य मार्गावर ठेवले पाहिजे. आता आपला सगळा संसार झालेला आहे. मग त्यातून बाहेर का पडू नये? साधनाच्या बाबतीत मनानेच मनावर पहारा केला पाहिजे. तुकोबा म्हणाले 'प्रपंच परमार्थ संपादीन दोन्ही। एकही निदानीं नव्हे त्यासी॥' मी कोठे घसरतो यावर एकसारखी बारीक नजर ठेवून स्वत:ला सांभाळले तरच साधन होईल. महाराज मला म्हणाले होते ''संसाराची खटपट संपल्यानंतर रोज जे ३-४ तास मिळतात ते तरी नामात नकोत का जायला? खरोखर दिवसभरात जो रिकामा वेळ मिळतो तो नामासाठी दिलात तर नामाच्या राशी पडतील.''

## |५०| (५ ऑगस्ट १९८८)

**पू. बाबा** : गुरुदेव रानडे यांच्याप्रमाणे कट्टाने नामस्मरण केले पाहिजे. नाम खरें वाटेपर्यंत आपल्याला याखेरीज दुसरा उपाय नाही. एकदा त्याचे खरेंपण पटले की ते नामच हात धरून पुढे नेईल. पण तोपर्यंत आपल्या प्रयत्नात कसूर होता कामा नये. नाम इतके घेतले पाहिजे की खऱ्या अर्थाने शेवटी हतबल झाले पाहिजे. मगच शरणागती येईल.

नाम जिवंत आहे. त्याला सद्गुरूंच्या अनुग्रहाचा संस्पर्श आहे. असे असूनही नाम घेतांना रस येत नाही, कारण विचाराबरोबर आवश्यक असलेले वैराग्य अद्यापि नाही. संसार चालला आहे तसा त्याच्या मार्गाने चालू द्या.

आता त्यात गुंतून राहायचे नाही असा मनाचा निश्चय केल्याखेरीज नामस्मरणात येणारा विक्षेप नाहीसा होणार नाही. आता राहीन तर नामासाठीच असा निश्चय करून नाम घेतले पाहिजे. मिळेल तो सर्व वेळ नामस्मरणात घालवण्याचा निश्चय केला पाहिजे. प्रथम एखादा दिवस तरी तसे वागून पहायला काय हरकत आहे?

**साधक प** : नामाने मनोवृत्ती सूक्ष्म व तरल होतात; शक्तिसंचय होतो. पण आपण ती शक्ती लगेच सांसारिक गोष्टीत खर्च करतो.

**पू. बाबा** : हे जर समजते तर आता सांसारिक गोष्टीतील लक्ष कमी केल्याखेरीज ह्या मार्गात प्रगती होणे अशक्य आहे. प्रगती व्हावी असे वाटत असेल तर आवश्यक पथ्ये सांभाळलीच पाहिजेत.

## |५१| (१९ ऑगस्ट १९८८)

**पू. बाबा** : आज एका साधक बाईंचा फोन आला होता. पहाटेपासून त्यांचे अनावर नामस्मरण चालू होते; इतके की त्यांना भीती वाटू लागली. मी त्यांना जेवण करून थोडी झोप घ्यायला सांगितले. नामात जीव रमू लागला की शक्तीची हालचाल सुरू होते. वास्तविक सद्गुरूकडून अनुग्रह घेतो तेव्हांच कुंडलिनी जागी झालेली असते. पण साधनामुळे तिची हालचाल सुरू झाली की सुरुवातीला असा त्रास होतो. पण त्याने घाबरून जाऊ नये. आपण कां घाबरतो? कारण आपल्याला नेमके काय पाहिजे ते माहीत नाही. आणि संसार सुटेल अशी भीती वाटू लागते. नामामध्ये सर्व योग येतात. खरे म्हणजे सर्व काळ, सर्व ठिकाणी आणि सर्व घटनात श्रीमहाराज आहेत हा भाव निर्माण झाला पाहिजे. याबाबतीत श्री. भाऊसाहेब (केतकर) आदर्श होते. महाराज सर्व पहातात. ते करतात ते आपल्या कल्याणाचेच असते असा एकविध अर्पण भाव निर्माण झाला पाहिजे. सर्व वेळ 'ते पहातील' असे वाटू लागले की भीती नाहीच, ते उभेच आहेत. आपण दार उघडत नाही.

## |५२| (२६ ऑगस्ट १९८८)

आज पू. बाबांनी श्रीमहाराज देहात असतांना गोंदवल्यास घडलेली एक जुनी हकिगत सांगितली. गोंदवल्यास दांडेकर आडनावाच्या एक वृद्ध नामनिष्ठ बाई रहात असत. एक दिवस दुपारचे जेवण झाल्यावर ब्रह्मानंद महाराज दांडेकर बाईंच्या खोलीत विश्रांती घेत होते तेव्हां त्यांना बाईंच्या कण्हण्याचा

आवाज ऐकू आला. त्यांनी पाहिले तर बाईंच्या अंगात खूप ताप होता. आता ताप सहन होत नाही असे त्या म्हणाल्या म्हणून ब्रह्मानंद महाराजांनी श्रीमहाराजांना बोलवून आणले. श्रीमहाराज म्हणाले, बाई, हे देहाचे प्रारब्ध आहे ते सोसले पाहिजे. यावर बाई म्हणाल्या की पण ते सोसवेल असे करा. श्रीमहाराज म्हणाले, करतो, पण तीन दिवसांऐवजी सहा दिवस ताप येईल. त्या ठीक म्हणाल्या आणि सहा दिवसांनी त्यांना बरें वाटू लागले!

ब्रह्मानंद महाराजांनी ही घटना कोणासच सांगितली नाही. तरीदेखील कर्णोपकर्णी ही गोष्ट लोकांना समजली. तेव्हां श्रीमहाराज भाऊसाहेबांना म्हणाले, भाऊसाहेब सबंध दुपार मी तुमच्याबरोबर होतो ना! आणि पहा, लोक काय वाटेल ते उठवतात.

बरे झाल्यावर दांडेकर बाई श्रीमहाराजांना म्हणाल्या की महाराज, आपण सदैव माझ्याबरोबर असावे. तेव्हा श्रीमहाराज म्हणाले, मी नेहमी असतोच. तुमची निष्ठा असली तरच माझे अस्तित्व जाणवते.

हे सांगून पू. बाबा म्हणाले की ही निष्ठा येण्याला शरणागतीसारखा उत्तम उपाय नाही.

**साधक क** : स्वामी रामदास म्हणत की surrender and total surrender हाच मार्ग आहे.

**साधक प** : सगुणाचे प्रेम वाटू लागले म्हणजेच खरी शरणागती येईल.

**साधक ग** : आमची स्थिती रामदासांनी दासबोधात सांगितल्याप्रमाणे झाली आहे, ते म्हणतात, 'निर्गुण नेलें संदेहानें। सगुण नेलें ब्रह्मज्ञाने। दोहींकडे अभिमानें। वोस केलें॥ १४-५-९॥ यातून बाहेर पडावयास पाहिजे आणि ते आमच्या प्रयत्नाने शक्य नाही.

**पू. बाबा** : असे जर आहे तर नाम घ्यायला बसण्यापूर्वी श्रीमहाराजांची प्रार्थना करावी. नाम एकनिष्ठेने व्हावयाचे ते त्यांच्याच कृपेने होते. नाम एकच आहे. आपल्या वृत्ती वरखाली होतात. काहीही होवो, नाम सोडू नका.

## ।५३। (९ सप्टेंबर १९८८)

पू. बाबांनी **Ramdas speaks** मधील काही भाग वाचून दाखवला. ते म्हणाले, सुरुवातीला काही दिवस स्वामी रामदासांची अशी स्थिती होई की कारखान्यात कामाला गेलेले असताना तेथील प्रश्न, काळजी सुरू होई पण घरी ध्यानाला बसले की सर्व काही विसरून जात. शेवटी हे जीवनातील द्वैत त्यांना

सहन होईना आणि त्यांनी श्रीरामाला प्रार्थना केली की आता संसारातून सोडव. आपली जरी तशी अवस्था नसली तरी जपात मन रमू दे, रस येऊ दे अशी नित्य प्रार्थना करावी. आपली जप करताना ओढाताण होते, नको ते विचार मनात येतात कारण हे जीवनातील द्वैत आहे. मी जितका खरा तितका परमेश्वर खरा किंवा श्रीमहाराज खरे असे वाटत नाही. मी मरणाची फक्त कल्पना करतो पण मरण म्हणजे काय ते मला माहीत नाही. मी आज जेथे आहे तेथे नसणार एवढेच विचाराने ठरवू शकतो.

नंतर पू. बाबांनी एक जुनी हकिगत सांगितली. पू. तात्यासाहेबांच्या मुलीचे लग्न होते. वरात निघायची होती आणि तेव्हा पू. बाबा श्रीमहाराजांना म्हणाले की भगवद्गीतेतील नवव्या अध्यायाला फार महत्त्व देतात तो मला तुमच्याकडून समजावून घ्यावयाचा आहे. श्रीमहाराज म्हणाले, काढा ज्ञानेश्वरी आणि वाचा. पू. बाबा म्हणाले, त्यावेळी मी ज्यूनिअर बी. ए. मध्ये होतो. वय २१-२२ त्यामुळे immature त्यामुळे मीही लगेच ज्ञानेश्वरी काढून नववा अध्याय वाचायला सुरुवात केली. पहिल्या काही ओव्या वाचल्या त्यात २-३ दृष्टांत दिलेले आहेत. १) मूल बापाच्याच ताटात जेवतांना बापाला भरवू लागते आणि तो त्याचे कौतुक करतो. २) आम्हाला गोड करून घ्या असे आधणातल्या तांदुळांना विनवावे लागत नाही. ३) कळसूत्री बाहुली सूत्रधाराला असे नाचव, तसे नाचव अशी विनंती करीत नाही. येवढे ऐकल्यावर श्रीमहाराज म्हणाले, पुरे, येवढे लक्षात ठेवलेत की सर्व भक्ती आली!

जप करतांना अनुभव येऊनही लोकांची प्रगती होत नाही असे श्री. भाऊसाहेब म्हणत. पू. बाबा म्हणाले, ह्या एकंदर गोष्टींचा अर्थ असा की भगवंताची कृपा आहेच; आम्ही पाहिजे तितके पुढे जात नाही, दार उघडत नाही. बाकीची कामे करून रोज ५-६ तास उपासना करीन असा निश्चय करा.

## |५४| (२३ सप्टेंबर १९८८)

**पू. बाबा** : आपले सर्व काही स्थल, काल, निमित्ताच्या मर्यादेत चालते. आपल्या आणि संतांच्या मनोरचनेत फरक असतो. आपण सर्व बाबतीत मोजमाप (quantification and enumeration) करतो. झोप इतके तास, खाणे इतके, जप इतका इत्यादी. याचे कारण आपण मायेत जगतो. जी मोजते ती माया. संत तिच्या पलीकडे जातात. आपण मायेच्या शक्तीची कल्पना करू शकत नाही. मग परमेश्वराची शक्ती कशी समजणार?

परमेश्वर आणि त्याची शक्ती अशी भिन्न नाही. तो शक्तिमयच आहे. आद्य शंकराचार्यांनी त्याचे वर्णन करताना तो सर्वज्ञ आणि सर्वशक्तिसमन्वित आहे असे म्हटले आहे. शक्तिमान म्हटलेले नाही. म्हणजे त्याच्यातच त्याची शक्ती आहे.

पू. बाबा म्हणाले, आपल्या आयुष्यात जे जे घडते ते सर्व त्या सत्तेकडून येते अशी जाणीव ठेवावयास पाहिजे. श्रीमहाराज मला म्हणाले की "नाम सोडू नका. शक्य तितक्या लोकांना नामाला लावा आणि स्वस्थ राहा." तसे राहण्याचा मी प्रयत्न करतो. भीमरावांना महाराज म्हणाले की नामात माझा प्राण आहे. श्रीमहाराजांनी सांगितले म्हणून भाऊसाहेबांनी मला आपला मुलगा मानले. नामाची आवड उत्पन्न होण्याकरता त्याचे Personification करावे. त्यामुळे नामाची संगत करणे सोपे होईल.

## |५५| (२१ ऑक्टोबर १९८८)

**पू. बाबा** : नामासंबंधी नुकताच आलेला एक अनुभव सांगतो. गुरुदेव रानडे म्हणत असत की एका नामात सर्व योग आहेत. मला प्रश्न पडला होता की हे कसे? नवरात्र चालू असल्याने बाहेर लाउड स्पीकरवर गरबा चालू होता त्यामुळे झोप लागणे शक्यच नव्हते म्हणून ह्या प्रश्नावर विचार करता करता नामाची प्रार्थना करून अंथरुणावर पडलो आणि डोळा लागला. झोपेत प्रथम एका विवरातून सरपटत जातो आहोत असे जाणवले. हा सुषुम्नेतून प्रवास असावा. नंतर स्वच्छ प्रकाश पडला व त्यानंतर त्या प्रकाशावर सुरेख अक्षरात वाक्ये येऊ लागली...

नाम हे वाग् इंद्रियाने घेतले जाते. वाणीला प्राणांचा आधार आहे. नामस्मरणाने प्राणांवर नियमन येते, म्हणजेच प्राणायाम साधतो. परत मनात विचार आला की प्राणायाम झाला तरी इतर पायऱ्या कशा साधतात? पुन्हा वाक्ये आली.

नाम घेता घेता एक लय येते व नामात रस येतो. हा रस लौकिक रसापेक्षा वेगळा असतो. ह्या रससेवनाने प्रत्याहार साधतो. नामाची धारणा होते व ध्यान आणि समाधीही साधतात.

हा अनुभव मोठा विलक्षण होता.

पू. बाबा पुढे सांगू लागले. मी श्रीमहाराजांना एकदा विचारले होते की नाम घेणाऱ्या सर्वांनाच नाद ऐकू येणे, प्रकाश दिसणे इत्यादी अनुभव का येत

नाहीत? त्या काळात मी नासाग्री दृष्टी स्थिर ठेवून नामस्मरण करत होतो. ८-१० दिवसात मला समोर काळा बिंदू तरंगताना दिसू लागला. गुरुदेव रानडे म्हणाले होते की सुरवातीला काळा ठिपका दिसतो व नंतर निरनिराळे रंग दिसू लागतात. पण असा जप करतांना मला त्रास होऊ लागला म्हणून श्रीमहाराजांनी तो प्रयत्न थांबवण्यास सांगितले.

श्रीमहाराज म्हणाले, गुहागरला जायला दोन मार्ग आहेत. एक मोटारीने व दुसरा बोटीने. मोटारीने जातांना रस्त्यावरचे मैलाचे दगड दिसतात; पण बोटीने जाताना तसे होत नाही. आपला मार्ग हा बोटीचा मार्ग आहे. तेव्हांपासून अनुभवांच्या मागे जाणे सोडून दिले.

श्री. भाऊसाहेबांनाही श्रीमहाराजांनी सुरवातीला षण्मुखी मुद्रेत नाम घ्यावयास सांगितले होते. पण पुढे ते भाऊसाहेबांनी सोडून दिले.

एका साधकानी एकदा श्रीमहाराजांना विचारले होते की नाम घेतांना श्रीमहाराजांच्या प्रतिमेचे ध्यान करावे की पादुकांचे म्हणजे मन एकाग्र होईल? यावर श्रीमहाराज म्हणाले, "एकीकडे नाम आणि एकीकडे प्रतिमेचे ध्यान करतांना चित्त एकाग्र कसे होईल? ही (एकाग्र चित्त) फार पुढची गोष्ट आहे. नामात मी आहे तो सोडून प्रतिमेचे किंवा पादुकांचे ध्यान कशाला? नामातच मला पहावे."

हे सांगून पू. बाबा म्हणाले, "नाम घेतांना नामाचेच चिंतन असावे म्हणजे ते नामात आहेत हे समजेल.

## ।५६। (२८ ऑक्टोबर १९८८)

आज बरेच बोलणे श्रीमहाराज, त्यांचे भक्त व त्यांना आलेले अनुभव इत्यादी विषयांवर झाले. पू. बाबांनी सांगितलेल्या काही महत्त्वाच्या गोष्टी.

(१) श्रीमहाराज देहात असतांना एका माणसाकडून पन्नास रुपये घेऊन त्यांनी ते दुसऱ्या माणसाला दिले. ज्याने श्रीमहाराजांना म्हणून ते पैसे दिले होते त्याला ते आवडले नाही. श्रीमहाराजांना हे समजल्यावर ते म्हणाले, "काय करू, मला दुसऱ्याचे दुःख पाहवत नाही."

(२) श्रीमहाराज देहात असतांना एकदा त्यांनी पू. तात्यासाहेबांना एक उपरणे दिले. त्यावेळी तात्यासाहेब वयाने लहानच होते. त्यामुळे ते पाहून काही लोक (विशेषत: बायका) हसले. तेव्हां श्रीमहाराज म्हणाले की "तुम्हाला कल्पना नाही तो पुढे किती मोठा होणार आहे याची!"

(३) पू. तात्यासाहेबांच्या एका नातेवाइकांना एकदा पू. बाबांना कोटाचे कापड द्यावेसे वाटले. त्याबद्दल त्यांनी महाराजांना विचारल्यावर ते म्हणाले, "तू या भानगडीत पडू नको; त्यांना काय द्यायचे ते मी देईन." हे सांगून पू. बाबा म्हणाले की खरोखर त्यांनी केवढे मोठे विचारधन दिले आहे.

(४) एकदा पू. बाबांनी श्रीमहाराजांना विचारले की तुम्हाला कोणी काही विचारले की त्याचे उत्तर लगेच कसे सुचते? त्यावर प्रथम श्रीमहाराज 'काही माहीत नाही बुवा' असे म्हणाले. मग म्हणाले की एखाद्या भक्कम लोखंडी पेटीत रत्ने आहेत, पेटी भक्कम आहे पण तिला लावलेल्या कुलुपाची किल्ली तुमच्याजवळ असली तर ती रत्ने केव्हाही हस्तगत होतात. रामनाम ही सर्वश्रेष्ठ किल्ली माझ्यापाशी आहे.

(५) एका वर्षी धुंधुरमासास ब्रह्मानंद महाराजांनी श्रीमहाराजांसाठी शेजघरातच ताट वाढून पाठवले. श्रीमहाराज म्हणाले, माझी अजून आंघोळ झालेली नाही, तर मी हे खाऊ का? ताट आणणारांनी ब्रह्मानंद महाराजांना हे विचारल्यावर ते म्हणाले, श्रीमहाराजांना चालेल. त्यांनी जेवावयास काही हरकत नाही. त्यांना दोष लागत नाही. तेव्हां श्रीमहाराज म्हणाले, माझ्या मागे इतकी माणसे आहेत. मी असा वागलो तर ते दसपट स्वैराचार करतील. श्रीमहाराज उठले व आंघोळ करून नंतर जेवले.

ह्या आणि इतर काही गोष्टी सांगून झाल्यावर पू. बाबा म्हणाले की श्रीमहाराजांना व्यवहार समजत असे पण ते व्यवहारचतुर नव्हते. ते म्हणत, "व्यवहार म्हटले की स्वार्थ आलाच; आणि तो माझ्याजवळ नाही. त्यामुळे मी व्यवहार चतुर नाही." तुम्ही सर्व काही त्यांच्यावर सोडून शरण जा म्हणजे तुमच्या हिताचे तेच ते करतील. पाहिजे तेव्हा पाहिजे तो माणूस येईल व मदत करील.

## |५७| (४ नोव्हेंबर १९८८)

सध्या सकाळी काकड आरतीच्या वेळी पू. बाबा नारदभक्तिसूत्रांवर निरूपण करतात. त्यापैकी एक सूत्र आज त्यांनी चर्चेस घेतले. प्रेमभक्तीची साधने सांगतांना नारद म्हणतात

मुख्यतस्तु महत्कृपयैव भगवत्कृपालेशाद्वा॥ ३८॥

महत्कृपया एव याचा अर्थ बहुतेकांनी संतांच्या कृपेने असा दिला आहे. पू. बाबा म्हणाले की श्रीमहाराज जेव्हां नारदभक्तिसूत्रांवर निरूपण करीत असत

तेव्हां संस्कृत वाचून त्याचा अर्थ प्रथम मी त्यांना सांगत असे. मग ते निरूपण करीत. ह्या सूत्राचा अर्थ जेव्हां मी त्यांना सांगितला (महत्कृपया = संतांच्या कृपेने) तेव्हा ते म्हणाले, "असे नव्हे, महत्कृपा म्हणजे बुद्धीची कृपा". बुद्धीची कृपा झाली की भगवंताचे प्रेम येईल असा अर्थ कोणत्याच पुस्तकात मिळत नाही. मात्र कोशात महत् व बुद्धी दोन्हींचा एकच अर्थ मिळतो. (The Second of the 25 principles of creation according to सांख्य) भगवद्गीतेतदेखील बुद्धीवर भर दिला आहे. 'बुद्धौ शरणमन्विच्छ' किंवा 'ददामि बुद्धियोगं' इत्यादी.

**पू. बाबा** : एकदा श्रीमहाराजांना विचारले की लोक ऐकत नाहीत तरीदेखील तुम्ही पुन:पुन्हा का सांगता? तेव्हा ते म्हणाले, "काय करावें, अविद्येचा जोर असतो. तेव्हां बुद्धीपर्यंत पोचेपर्यंत पुन्हा पुन्हा सांगावे लागते. बुद्धीचा एकदा निश्चय झाला, ती नामात स्थिर झाली की काम झाले." म्हणून महत्कृपया म्हणजे बुद्धीची कृपा झाली तरच. बुद्धीचा निश्चय होणे ही तिचीच कृपा आहे.

श्री. अण्णासाहेब मनोहर एकदा श्रीमहाराजांना म्हणाले की महाराज आपण कृपा करा. तेव्हां श्रीमहाराज म्हणाले, "मी केव्हांच कृपा केली आहे, आता तुम्हीच तुमच्यावर कृपा करा." म्हणजे आता तुमचीच बुद्धी जागी होऊ दे, निश्चय करू दे.

**साधक क** : बुद्धीला नामाचे सत्यत्व पटत नाही. आपल्याला दृश्य खरें वाटते कारण त्याचा आपल्याला जन्मोजन्मी सहवास आहे. त्या जागी जन्मोजन्मी नामाच्या खरेपणाचे संस्कार होतील तेव्हांच दृश्याचे खरेंपण मावळून नाम सतेज होऊन उठेल.

**पू. बाबा (साधक ग कडे पाहून)** : सत्संगतीखेरीज तरणोपाय नाही. सद्ग्रंथ आहेत, पण आपण ते शुद्ध बुद्धीने वाचले पाहिजेत. नंतर सूक्ष्म देहाच्या स्वरूपासंबंधी चर्चा झाली. सूक्ष्म देह दिवसा सहज समजत नाही. त्याच्यात अनेक स्पंदने होत असतात. पण रात्री तो देहातून बाहेर पडतो, तथापि देहाला जोडलेला रहातो. झोप संपते तेव्हा तो पुन्हा स्थूल देहात प्रवेश करतो. रात्री सर्व माणसे झोपली की काही वेळा महाराज त्यांची जुनी लंगोटी फाडून टेंभा करीत व नागप्पाला बरोबर घेऊन कोण कोठे झोपला आहे ते पहात. तेथे जमणाऱ्या लोकांत एक शिस्त राहावी म्हणून श्रीमहाराज असे करतात असे पुष्कळांना वाटे. पण त्या बाबतीत श्रीमहाराज म्हणत की मनुष्य

झोपला की त्याचा सूक्ष्म देह स्पष्ट दिसतो व त्याच्या वासना काय आहेत याचे ज्ञान होते.

मनुष्य मरतो तेव्हांही त्याचा सूक्ष्म देह त्याच्या जड देहातून बाहेर पडतो. त्यावेळी तो शरीराशी जोडलेला राहात नाही. त्यामुळे तो त्या शरीरात परत प्रवेश करू शकत नाही. कित्येकदा तो जड देहामागून स्मशानात जातो व जड देहाचा नाश झालेला पाहिला की पुढचा रस्ता धरतो. म्हणून पुरण्यापेक्षा दहनाची प्रथा जास्त चांगली. स्थूल शरीराच्या पंच ज्ञानेंद्रियांप्रमाणे सूक्ष्म शरीराच्यादेखील पंच तन्मात्रा असतात.

**|५८|** (११ नोव्हेंबर १९८८)

पू. बाबा आज खूप प्रसन्न दिसत होते. स्वत:संबंधी आज ते बरेच बोलले.

स्वत:चे काही अनुभव सांगतांना ते म्हणाले की 'अंतर्यात्रा' आणि 'प्रेमयोग' ही दोन पुस्तके लिहिण्याची श्रीमहाराजांनी प्रेरणा दिली. असे काहीतरी लिहावे असे क्वचित वाटत असे. पण मग सर्व लिखाण दिसू लागले; त्याचे दोन भाग करून ही पुस्तके लिहिली.

'संतांचें आत्मचरित्र' लिहितांनादेखील असाच अनुभव आला. विशेषत: सकाळी आंघोळीनंतर जप केला की जे संतचरित्र लिहावयाचे असेल ते आपोआप उलगडत जात असे.

पू. बाबा पुढे म्हणाले, ह्या वर्षी सप्टेंबरच्या शेवटी गोंदवल्यास जे साधन शिबीर झाले त्याला जाण्याची त्यांची इच्छा नव्हती. कारण येथेच साधन चांगले चालले होते. श्री बापूसाहेब दामले खूप आग्रह करू लागले तेव्हां त्यांना 'तुम्ही उगीच गळेपडूपणा करू नका' असेही मी म्हणालो. पण दुसरे दिवशी सकाळी 'आपण जावे' अशी श्रीमहाराजांची प्रेरणा आली व सर्व बेत बदलला. तीव्र इच्छाशक्तीने विचार subconscious मधून अशी प्रेरणा देऊ शकतात. प्रेरणा व आदेश यांमधे फरक असतो. आदेश म्हणजे सरळ सरळ आज्ञा असते. ती पाळणे येवढेच शिष्याच्या हातात असते. उदाहरणार्थ, जास्तीत जास्त लोकांना नामाला लावावे हा श्रीमहाराजांचा आदेश होता.

एकदा मी श्रीमहाराजांना विचारले की आपण अशा कुग्रामात (गोंदवल्यात) का राहिलात? ते म्हणाले की ब्रह्मज्ञानी जरी झाला तरी त्याला देशकाल परिस्थिती पाहून वागावे लागते.

|५९| (१८ नोव्हेंबर १९८८)

पू. बाबांनी The open door ह्या पुस्तकातील काही भाग वाचून दाखवला आणि साधन करतांना देहाचा विसर कसा पडला पाहिजे यासंबंधी कृष्णमूर्तींचे विचार आणि तुकाराम महाराजांचे विचार यांमधील साम्य स्पष्ट केले.

नंतर श्रीमहाराजांच्या काही भक्त मंडळींच्या आठवणी त्यांनी सांगितल्या.

श्री. रामकृष्णपंत दामले जलोदराने आजारी होते. श्रीमहाराजांनी मी तुमच्याजवळ आहे असे त्यांना आश्वासन दिल्यावर देहदु:खाचा विसर पडून त्यांनी शांतपणे देह ठेवला.

श्रीमहाराज म्हैसूरला गेले होते. तेथे एका माणसाला भूतबाधा झाली होती. ते भूत वेदमंत्र म्हणत असे. त्या माणसाला नामस्मरण करू द्यावे म्हणून श्रीमहाराजांनी त्या भुताचे मन वळवले व अशा प्रकारे त्या माणसाला आणि भुताला दोघांनाही सोडवले. पू. बाबा म्हणाले, त्यावेळी मी श्रीमहाराजांना विचारले की ते भूत नाम का घेऊ देत नव्हते? श्रीमहाराज म्हणाले, भूतयोनीतील संपत्ती ही आसुरी संपत्ती असते तर नाम ही दैवी संपत्ती आहे. आसुरी संपत्तीस दैवी संपत्ती सहन होत नाही. हे उत्तर ऐकल्यावर मला वाटले की श्रीमहाराजांनी भगवद्गीता निश्चितच वाचलेली असली पाहिजे. वास्तविक ते ज्ञानावर आरूढ आहेत हे त्यावेळी समजले नाही.

पू. बाबा पुढे म्हणाले की पूर्वग्रहविमुक्त झाल्याखेरीज अभिमान आणि देहबुद्धी नष्ट होणे शक्य नाही. श्रीमहाराज विशेष शिकलेले नाहीत हा देखील असाच पूर्वग्रह होता.

**साधक ग** : पूर्वग्रह गेले तर जीवनातले आमचे संदर्भच (reference points) नाहीसे होतील. कोणत्याही व्यक्तीकडे वा घटनेकडे प्रत्येक वेळी कोरेपणाने पहाणे अवघड आहे. आम्हाला त्याची सवय नाही.

**पू. बाबा** : स्मृती आणि पूर्वग्रह यात फरक आहे. पूर्वग्रहात valuation असते. सवयीचे म्हणाल तर प्रत्येक गोष्ट सद्गुरूंना सांगून करावयाची सवय लावून घ्यावी म्हणजे अनुसंधान टिकते. एकदा मी श्रीमहाराजांना विचारले की कॉलेजात लेक्चर चालू असतांना कसे अनुसंधान टिकणार? श्रीमहाराज म्हणाले की वर्गात शिरतांना आणि वर्गातून बाहेर पडतांना माझे स्मरण करावे म्हणजे मधेपण मी असेनच. त्यानंतर मी स्वत:ला अशी सवय लावून घेतली.

पैसा व अन्य सांसारिक गोष्टींचा मोह सुटत नाही. आमची शक्ती कमी पडते हे रडगाणे किती दिवस गाणार? आता थोडे दिवस राहिले आहेत हे लक्षात घेऊन नामाची निकड वाटू लागली पाहिजे.

## |६०| (२५ नोव्हेंबर १९८८)

सुरुवातीला पू. बाबांनी 'विनोबांची महाप्रयाण यात्रा' ह्या श्री. रामभाऊ म्हसकर यांनी संकलन-संपादन केलेल्या पुस्तकातील काही भाग वाचून दाखवला. त्यात विनोबांची शेवटी झालेली विकलांग अवस्था, स्मृतिनाश, लहान मुलासारखे वागणे इत्यादी वर्णन आहे. पू. बाबा म्हणाले की आपली शेवटी अशी अवस्था होऊ नये.

**साधक ग** : ते आपल्या हातात आहे काय?

**पू. बाबा** : पू. तात्यासाहेब ८३ वर्षे आणि श्री. भाऊसाहेब ९२ वर्षेपर्यंत जगले. एकदा श्रीमहाराज म्हणाले की माझ्या देहाला सांभाळले नाही इतके मी तात्याच्या देहाला सांभाळतो. ताई सांगत की एरवी थोडे जास्त खाल्ले तरी ते तात्यांना बाधे पण श्रीमहाराज म्हणून ते बाहेर जात तेव्हा खूप आणि अनेकदा खाऊनही त्यांना बाधत नसे!

**साधक क** : जाणीवपूर्वक भक्ती केली तर म्हातारपण चांगले जाईल असे वाटते. श्रीमहाराज समर्थांच्या बाबतीत जे म्हणाले ते खरोखर त्यांच्याही बाबतीत खरें आहे. श्रीमहाराज म्हणत की समर्थांनी मातीतून अत्तर काढले. श्रीमहाराजांनी देखील सामान्य प्रापंचिकांना परमार्थाला लावले.

## |६१| (९ डिसेंबर १९८८)

**पू. बाबा** : एक फार जुनी आठवण सांगतो. तेव्हां मी २०-२२ वर्षांचा होतो. श्रीमहाराजांनी विचारले की भगवान श्रीकृष्णांना अर्जुनाला गीता कां सांगावी लागली? प्रश्न विचारून आपणच पुढे म्हणाले अर्जुनाची वेपथुश्च शरीरं मे इत्यादी लक्षणे दाखवतात की त्याला देहबुद्धीचा ज्वर आला होता. (ही लक्षणे तापात आढळतात.) मी कर्ता, मी भोक्ता इत्यादी विचारांनी तो मोहग्रस्त झाला होता. मुदतीच्या तापात देखील ताप उतरतांना एक अशी नाजुक स्थिती (critical stage) होते. यात रोगी वाचतो तरी नाहीतर मरतो तरी. त्याला घाम येतो, कंप सुटतो, अंगाची आग होते. देहबुद्धीचा ज्वर उतरतांना पण असेच होते. श्रीमहाराजांनी सांगितलेले त्यावेळी ऐकले पण पूर्ण

समजले नाही. फक्त येवढेच वाटले की श्रीमहाराजांनी गीता वाचलेली असली पाहिजे. खरोखर तेव्हा त्यांच्या अवस्थेची कल्पनाच नव्हती.

नंतर पू. बाबांनी एक महत्त्वाचा मुद्दा मांडला. ते म्हणाले, जीवनात कमी जास्ती व्हायचेच. पण आपण मन क्षुद्र होऊ देता कामा नये. दुसरा क्षुद्रपणे वागला तरी आपण विशाल झाले पाहिजे, कारण क्षुद्रपणा साधनाच्या आड येतो. आपण एकदम खाली घसरतो.

मागे चर्चा झालेला मुद्दाच पुन्हा निघाला. मनाचे stuff (द्रव्य) structure (रचना) व function (कार्य) कोणती? हे समजले तर मनावर ताबा मिळवणे सोपे जाईल.

**साधक प** : मन जड आहे.

**साधक क** : भोग कोण घेतो?

**साधक प** : इंद्रिये भोग घेतात.

**साधक क** : इंद्रिये ही नुसती दारे आहेत. त्यांच्या द्वारा मन भोग घेते.

**साधक प** : शास्त्रज्ञानी मांजराला बेशुद्ध करून electrodes च्या सहाय्याने त्याच्या मेंदूच्या केलेल्या अभ्यासावरून इंद्रिये भोग घेतात असे सिद्ध केले आहे.

**साधक क** : एक म्हणजे हे बेशुद्ध मांजरावर केलेले प्रयोग होते. आणि दुसरे, माणसाचे मन मांजराच्या मनापेक्षा खूपच प्रगल्भ आहे.

**पू. बाबा** : अनुभव हे मनाचे द्रव्य आहे व स्मृती हे structure आहे. मनाचे अनुभव नामाने दिव्य बनतात. श्री. रामकृष्णपंत दामले ज्या दिवशी वारले त्या दिवशी संध्याकाळी मला ते आमच्या घराच्या दारात उभे दिसले. तीव्र इच्छाशक्तीमुळे असे होऊ शकते.

## **|६२|** (३१ डिसेंबर १९८८)

पू. बाबांची गोंदवले येथील खोली.

पू. बाबांनी श्रीमहाराजांच्या काही आठवणी सांगितल्या. नाम घेतांना चित्त एकाग्र होत नाही त्यासाठी काय करावे याबद्दल बरीच चर्चा झाली. निष्कर्ष असा : आम्ही नामाला चिकटत नाही कारण ते प्रपंचाइतके खरें वाटत नाही. नाम घेतांना सहजपणा पाहिजे. आम्ही नाम घेतो तेव्हां ताण असतो.

**साधक अ** : नामाला बसतांना आपल्या चिंता आंघोळीला जातांना कपडे बाजूला ठेवतो तशा बाजूला ठेवाव्या. पाहिजे तर सांभाळण्यासाठी त्या

श्रीमहाराजांकडे द्याव्या व नाम घेऊन झाले की त्यांच्याकडून परत घ्याव्या. परत घेतांना त्या पूर्वीपेक्षा स्वच्छ आणि हलक्या झालेल्या असतात.

**साधक ब** : नामाला बसतांना मी इतर विचार तात्पुरते फ्रीज करतो (गोठवतो).

**साधक ग** : हे सर्वांनाच साधेल असे नाही. नाम घेतांना कोणता भाव असेल ते प्रत्येकाच्या मनोवृत्तीवर अवलंबून राहील.

**पू. बाबा** : नाम घेतांना आपण काहीतरी मौल्यवान चीज सांभाळतो आहोत असे वाटले पाहिजे. तुलसीदासांनी नामाला 'रामरतन' आणि सद्‌गुरूनीं कृपा करून दिलेली अमूल्य वस्तू म्हटले आहे.

## |६३| (२ जानेवारी १९८९)

(मार्गशीर्ष वद्य १०. श्रीमहाराजांची पंच्याहत्तरावी पुण्यतिथी)

रात्री ७ वाजता गोंदवले येथील पू. बाबांची खोली.

काल पू. बाबांच्या खोलीत गेलो होतो तेव्हां त्यांनी ज्ञान अज्ञान इत्यादी बाबतीत चर्चा केली होती. विपरीत ज्ञान हा अज्ञानाचाच भाग आहे असे सांगून त्यांनी अज्ञानाचे structure (संरचना) काय असा प्रश्न केला. चर्चेचा समारोप करतांना ते म्हणाले, त्रिपुटी हे अज्ञानाचे structure आहे. ज्ञान झाले की द्रष्टा, दृश्य, दर्शन; ज्ञाता, ज्ञेय, ज्ञान इत्यादी त्रिपुटी नष्ट होतात. किंबहुना त्रिपुटी नाहीशा होणे हे ज्ञानाचे लक्षण होय.

## |६४| (१३ जानेवारी १९८९)

मालाड येथे पू. बाबांच्या घरी.

**पू. बाबा** : अविद्या आणि अज्ञान हे समानार्थी शब्द नाहीत. अविद्येमध्ये विपरीत ज्ञान असते. परीत म्हणजे परमतत्त्व जाणणारे. त्याविरुद्ध ते विपरीत.

**साधक क** : शांतच्या उलट शब्द कोणता? वासनापूर्ण म्हणता येईल का? कारण वासना असल्या की शांती नसते.

**साधक प** : क्षोभ हा शांतीच्या उलट आहे.

**साधक ग** : शांतीच्या उलट अशांती. केवळ शांतीचा अभाव. क्षोभामध्ये खळबळ आहे. वृत्तिरहित झाल्याखेरीज खऱ्या शांतीचा अनुभव येणार नाही.

**पू. बाबा** : हे खरें आहे. पण जर केवळ भगवंताची वृत्ती मनात सतत उठत राहिली तरी देखील शांतीचा अनुभव येईल. त्यात देहाचा विसर आहे.

आज पू. बाबांच्या पावलांवर व उजव्या गुडघ्यावर सूज आहे. त्या बाबत ते म्हणाले की औषध चालू आहे आणि नाम चालू आहे. एकसारखा ठणका नाही; आणि असला म्हणून काय झाले? जोपर्यंत नाम चालू आहे तोपर्यंत देहाचे काही कां होईना? तुम्हाला सांगतो, लक्षात ठेवा. देहाच्या पलीकडे गेल्याखेरीज परमार्थ होणार नाही आणि त्यासाठी शिस्तीची गरज आहे.

## ।६५। (२० जानेवारी १९८९)

**पू. बाबा** : जे. कृष्णमूर्तींच्या जवळ काही काळ राहिलेले एक वैद्य नुकतेच भेटले होते, त्यांनी कृष्णमूर्तींच्या काही आठवणी सांगितल्या. कृष्णमूर्ती खरोखरच भूतकाळ विसरून जात. कित्येकदा त्यांना शरीराचे भान नसे. आजारी असले तर होमिओपथीची किंवा आयुर्वेदिक औषधे घेत. ते वैद्य म्हणाले की कित्येकदा असे आढळून आले की कृष्णमूर्ती आजारी असले तरी त्यांच्या नाडीत फरक पडत नसे. ह्याबद्दल त्यांना विचारले तेव्हा ते म्हणाले की मन स्थिर म्हणून नाडी स्थिर. श्रीमहाराजही म्हणत असत की आजार आधी मनात होतो व मग शरीरात होतो. सूक्ष्मातून तो स्थूलात येतो. कृष्णमूर्तींना कोणत्याही वस्तूबद्दल कधी आसक्ती वाटली नाही. एकदा एका परदेशातील स्त्रीने त्यांच्या मलमलीच्या शर्टची प्रशंसा केली. तिला तो फार आवडला म्हणून त्यांनी तिला तो देऊन टाकला. खरोखर त्यांच्याजवळ त्यांचे स्वत:चे असे काही नव्हते. 'स्व' च जेथे नाहीसा झाला होता तेथे स्वत:चे ही भावना कोठून येणार!

नंतर नामस्मरण कसे करावे ह्यासंबंधी चर्चा झाली. पंतजलीने नैरन्तर्य सांगितले आहे. श्रीमहाराज अखंड नामस्मरण म्हणत असत.

**साधक प** : नामस्मरण करावयाचे म्हणजे काय करावयाचे तेच आम्हाला समजत नाही. समजा मला तुमचा फोन नंबर आठवत नाही आणि तो आठवण्याचा मी प्रयत्न करतो आहे. नंबर आठवण्याचे मला स्मरण आहे पण नंबराचे स्मरण नाही. तसे नामस्मरण करावयाचे आहे पण नाम येत नाही.

**पू. बाबा** : नाम कसे घेतले पाहिजे ते सांगताना ब्रह्मानंद महाराज म्हणाले की मूल कसे आईच्या अंगावर पिते तसे नाम घेताना वाटले पाहिजे. पू. बाबा पुढे म्हणाले, श्वासावर नाम घेऊन कदाचित शिस्त येईल पण नामाचे प्रेम येईलच असे सांगता येत नाही. श्री ज्ञानेश्वर महाराजांनी म्हटले आहे, 'स्तन्यालागूनी पाही। बाळातें अनवसरू नाहीं।' तसे नाम घेतले पाहिजे. वेळ

मिळाला की नाम असे करता करताच नामाशिवाय क्षणही फुकट जाणार नाही. नामस्मरणाला वेळ मिळत नाही ही लंगडी सबब आहे. श्रीमहाराज म्हणत की जेवढा रिकामा वेळ मिळतो तेवढ्या वेळात जरी रोज नामस्मरण केलेत तरी नामाच्या राशी पडतील. खरोखर आपण रोज किती वेळ फुकट घालवतो.

'जेणें विठ्ठलमात्रा घ्यावी। तेणें पथ्यें सांभाळावी॥' नामस्मरणाने चित्त शुद्ध झाले पाहिजे. त्यासाठी आचरणही शुद्ध पाहिजे. आहार विहारात संयम हवा. वैराग्याखेरीज परमार्थ नाही. आत्तापर्यंत पैसा मिळवला तो पुरे, भोग भोगले ते पुरेत, आता उरलेले सर्व जीवन नामाला वाहिले असे आतून वाटले पाहिजे. 'हा एक जन्म नामाला दिला; गेला फुकट तरी चालेल' असे म्हणावे. तो फुकट जात नाहीच. आणि नाहीतरी आता तो फुकटच चालला आहे. आता तरी हा जुगार खेळायची तयारी पाहिजे.

## ।६६। (२७ जानेवारी १९८९)

नाम खरें वाटत नाही म्हणून नामस्मरण होत नाही हा नेहमीचाच मुद्दा होता त्यात एक दोन नवीन मुद्दे आले.

१) व्हाइटहेड म्हणतो की निसर्ग माणसाच्या विरोधात आहे. थर्मोडायनेमिक्सच्या नियमाप्रमाणे निसर्गात सतत विघटनाची क्रिया चालू असते. याउलट कोणतीही वस्तू संघटनाने झालेली असते व विघटन टळावे म्हणून प्रयत्न चालू असतो.

२)ज्ञानेश्वर महाराजांनी म्हटल्याप्रमाणे दीपज्योत एकच दिसली तरी प्रतिक्षणी ती नवी बनत असते. आपणही तसेच आहोत. प्रत्येक क्षणाला आपण नवे बनत आहोत आणि म्हणून कोणत्याही क्षणी आपण ईश्वरसन्मुख होऊ अशी आशा आहे.

३) मन जडही आहे व सूक्ष्महीं आहे. अशा ह्या मनाच्या सहाय्यानेच मन जिंकावयाचे आहे.

## ।६७। (८ फेब्रुवारी १९८९)

आज पू. बाबांना ८० वर्षे पूर्ण होऊन ८१ वे वर्ष लागले. शनिवारपासून त्यांना ताप येतो आहे. (urinary infection असावे असे डॉक्टर म्हणतात). आजही १०२ अंश ताप होता तरीदेखील त्यांनी उठवून बसवावयास सांगितले व थोडा वेळ बोलले. ताप असला आणि अंग दुखत

असले तरी नामस्मरण उत्तम चालू आहे असे ते म्हणाले. ते म्हणाले, श्रीमहाराज म्हणत की ज्ञानमार्ग हा संन्याशाच्या डोक्यासारखा खरखरीत (रुक्ष) आहे तर भक्तिमार्ग लहान मुलाच्या जावळासारखा मऊ (कोमल) आहे.

आपणांस सुख पाहिजे असे वाटते कारण मूळ आपण आनंदमय आहोत. 'अजरामरवत् प्राज्ञो विद्यामर्थंच साधयेत्। गृहीत इव केशेषु मृत्युना धर्ममाचरेत्॥'' इतकी माणसे जात असतांना रोज दिसतात तरी आपण इतक्यात जाणार नाही असे का वाटते? वास्तविक श्रीसमर्थांनी म्हटल्याप्रमाणे 'सरता संचिताचे शेष। नाही क्षणाचा अवकाश। भरता न भरता निमिष। जाणें लागे॥'

**साधक ग** : आपले मूळ स्वरूप आनंदमय असल्यामुळे आपल्याला सुखाची ओढ आहे तशी अमरत्वाची मूळ ओढ असल्यामुळे आपल्याला आपल्या मरणाचे भान नाही. फक्त ते अमरत्व आपण देहावर लादतो.

**पू. बाबा** : हे बरोबर आहे. तथापि ब्रदर लॉरेन्सप्रमाणे सर्वकाळ भगवंतासन्निध राहता आले पाहिजे.

आज आपला गुरूपेक्षा औषधावर जास्त विश्वास आहे. पण औषधही भगवंतानेच निर्माण केले आहे. त्याला बरे करावे असे वाटले तर तो त्या औषधाचा गुण देईल, नाहीतर नाही, तेव्हा आपण उगीच चिंता का करावी?

### ।६८। (१४ फेब्रुवारी १९८९)

संध्याकाळी पू. बाबांना भेटण्यास मालाडला गेलो. आता त्यांची प्रकृती सुधारत आहे. न्युमोनियावर उपचार चालू आहेत. डॉ. फणसळकरांच्या सल्ल्याने डॉ. आर. व्ही. देशपांडे उपचार करीत आहेत.

**पू. बाबा** : मी महाराजांना एकदा म्हणालो की अति दारिद्र्यात अनुसंधान राहणे कठीण आहे. त्यावर श्रीमहाराज चटकन म्हणाले आणि देहदु:ख असताना. त्यांचे हे म्हणणे किती खरें आहे हे त्यावेळी समजले नाही पण आता त्याचा प्रत्यय येतो. तथापि माझे नाम व्यवस्थित चालू आहे. खरोखर ज्यांना ही सवय नाही त्यांचे आजारात काय होत असेल ह्याची कल्पना करवत नाही.

### ।६९। (२४ फेब्रुवारी १९८९)

पू. बाबांच्या प्रकृतीत बरीच सुधारणा आहे. ते म्हणाले की आपण बाह्य

शक्तींविषयी बोलतो. तसेच पचनशक्ती, स्मरणशक्ती इत्यादी शारीरिक शक्तींविषयीही बोलतो. पण आपली अंत:शक्ती आपल्याला माहीत नाही. ती जाणली तर काय होईल?

**साधक ब** : कदाचित आपण सर्वशक्तिमान आहोत हे जाणवल्यामुळे माणूस पूर्ण दयाळू होईल.

**साधक प** : काय होईल ते त्या माणसाच्या हेतूवर अवलंबून राहील.

**साधक ज** : रावणाने आपली शक्ती दुष्ट कामांकरिता वापरली.

**साधक प** : हिटलरनेही तसेच केले.

**साधक ग** : रावण किंवा हिटलर यांना अंत:शक्तीची जाणीव झाली होती असे वाटत नाही. अंत:शक्तीची जाणीव व्हावयाला प्रथम राम कर्ता ही जाणीव दृढ झाली पाहिजे. श्रीरामकृष्ण म्हणत त्याप्रमाणे तू यंत्री, मी यंत्र असे खरें वाटू लागले पाहिजे. देहबुद्धी आणि वासना गेल्या पाहिजेत.

**पू. बाबा** : शक्ती हे परमात्मस्वरूप आहे व नाम आणि नामी अभिन्न आहेत. आपल्याला हे विचाराने समजते तरी उमजत नाही म्हणून सतत नाम आणि नामी यांच्या अभिन्नत्वाची भावना केली पाहिजे. त्याखेरीज राम कर्ता हा भाव दृढ होणार नाही.

**साधक ख** : राम कर्ता हा भाव एकनाथ महाराजांच्या ठिकाणी पूर्णत्वाने दिसतो. ते म्हणाले की कोणी मला विद्वान म्हणतात, कोणी मूर्ख म्हणतात तर कोणी अव्यवहारी म्हणतात. पण हे सर्व जनार्दनस्वामीच करवीत आहेत.

## |७०| (३ मार्च १९८९)

पू. बाबांची प्रकृती सुधारत असली तरी गेले दोन तीन दिवस त्यांना रात्री कणकण वाटते. कफही झाला आहे. देहभोगाच्या संदर्भात ते म्हणाले की डॉ. धराधर (हे पुढे अनंतस्वामी झाले) यांनी श्रीरामकृष्णांकडून अनुग्रह घेतलेल्या एका गृहस्थांची हकिगत सांगितली. त्यांचे ॲपेंडिसायटिसचे ऑपरेशन व्हावयाचे होते. महात्मा गांधींचे ज्यांनी ऑपरेशन केले ते डॉ. मॅडॉक ऑपरेशन करणार होते. १९३० मधील ही हकिगत. त्यांनी डॉक्टरांना सांगितले की मला भूल देऊ नका; फक्त १० मिनिटे आधी सांगा आणि मग भूल देणे जरूर वाटले तर भूल द्या. नंतर ते समाधीत गेले आणि भूल न देताच त्यांचे ऑपरेशन केले!

हे सांगून पू. बाबा म्हणाले की देहावर अशी सत्ता पाहिजे. ती मिळवता येते

याचे हे उदाहरण आहे. आज माझी स्थिती अशी आहे की त्रास वाटू लागला की मी डॉक्टरना फोन करायला सांगतो. म्हणजे डॉक्टर त्रास कमी करतील असे वाटते.

**साधक ज** : डॉक्टरांच्या मार्फत सद्गुरूच बरे करतात असे का नाही म्हणू ?

**पू. बाबा** : तुमचे म्हणणे बरोबर आहे. असा देखील विचार करता येईल. पण खरोखर तसे वाटत नाही. औषधाने गुण येतो पण त्या औषधात बरे करण्याचे गुण भगवंताने घातले आहेत असे स्मरण ठेवावे असे श्रीमहाराज म्हणत. पण अजून तसे होत नाही. ह्या सर्वांचे कारण एकच आहे आणि ते म्हणजे दृश्य खरें वाटते तसे महाराज किंवा नाम खरें वाटत नाहीत. स्थल, काल, निमित्ताच्या परिघात देह वावरतो आणि मी म्हणजेच देह असे वाटते. हाच अहंकार. हा अहंकार आणि ममत्व गेल्याखेरीज नाम वाढणार नाही आणि परमार्थ साधणार नाही.

**साधक ब** : हे घडण्यास भगवंताची कृपा पाहिजे. ब्रदर लॉरेन्सप्रमाणे सर्वत्र भगवंत पहाता येणे फार अवघड आहे.

सुमारे १५ दिवसांपूर्वी कान्हनगडच्या आनंदाश्रमातील स्वामी रामदास यांच्या शिष्या माताजी कृष्णाबाई वारल्याचे साधक ब यांनी सांगितले. (माताजी १२ फेब्रुवारी १९८९ रोजी अनंतात विलीन झाल्या.)

काही वर्षांपूर्वी साधक आनंदाश्रमात गेले होते. त्यावेळच्या तेथील शांत व पवित्र वातावरणाचे व माताजींच्या भेटीचे त्यांनी वर्णन केले. त्यांनी त्यावेळी माताजींना विचारले होते की नामस्मरण हे परिपूर्ण साधन आहे की त्याला आणखी योग इत्यादींची जोड पाहिजे. माताजी म्हणाल्या, थोडा वेळ थांबा, आत्ता जी कॅसेट लावणार आहेत ती ऐका. (त्यावेळी तेथे रोज संध्याकाळी अर्धा तास स्वामी रामदासांची एखादी कॅसेट लावत असत). त्या दिवशीच्या कॅसेटमध्ये स्वामी रामदासांनी सांगितले होते की नाम हे सर्वांग परिपूर्ण साधन आहे. त्याला दुसऱ्या कशाचीही जोड देण्याची आवश्यकता नाही.

हल्ली आमच्यापैकी एका साधकांच्या चालू लागले की छातीत दुखते. अँजायनाचा त्रास आहे. रक्तदाबही कमी झाला आहे. त्यांना पू. बाबांनी भीती वाटते का म्हणून विचारले. ते म्हणाले की वैद्यक शास्त्रात जे इलाज आहेत ते चालू ठेवले आहेत. अनेकांना हा त्रास होतो, त्यात आपण एक. जास्तीत

जास्त काय हृदयक्रिया बंद पडेल असे वाटते. त्यामुळे भीती वाटत नाही, पण त्याचबरोबर खूप नामस्मरण व्हावे असे वाटते, ते होत नाही.

### |७१| (१० मार्च १९८९)

पू. बाबांची प्रकृती आता सुधारते आहे तथापि गेले चार दिवस रात्री ताप येतो. दिवसा ठीक असते. आत्ता संध्याकाळी ताजेतवाने दिसत आहेत.

**पू. बाबा** : रोज ऊन पाण्याने आंघोळ करतो. पहिला तांब्या खांद्यावर घ्यावा, डोक्यावर घेऊ नये असे श्रीमहाराजांनी सांगितले आहे. कारण आपण बुद्धिजीवी आहोत असे ते म्हणाले. मला अशी सवय लागली होती की अगदी लहान सहान गोष्टदेखील श्रीमहाराजांना विचारून करीत असे. त्यामुळे पू. तात्यासाहेब गेल्यावर काही दिवस मला जड गेले. पण नंतर श्रीमहाराजांच्या तसबिरीसमोर सांगू लागलो. असे करण्यात अखंड स्मरण राहते आणि राम कर्ता ही भावना दृढ होते.

पूर्वी किडनी स्टोनचा त्रास होत असतांना एकदा श्रीमहाराजांना विचारले तेव्हा त्यांनी धने उकळून पाणी पिण्याचा उपाय सांगितला. पुढे म्हणाले की आणखी 'सोपा' उपाय म्हणजे भोग भोगून संपवावा.

एकदा पू. तात्यासाहेबांना ताप येत होता तेव्हा श्रीमहाराजांना विचारा असे ते म्हणाले. त्याप्रमाणे (पेटीवर) विचारल्यावर श्रीमहाराज म्हणाले की काढा घ्यावा म्हणजे बरे वाटेल. एकदा कोणीतरी पू. तात्यासाहेबांना आग्रहाने खूप पोहे खायला घातले. त्यावेळी त्यांचे वय साठ वर्षांचे पुढे होते. दुसरे दिवशी त्यांना त्रास होऊ लागला तेव्हा श्रीमहाराज म्हणाले "बरें वाटेल, पण लोकांनीही काही विचार करावा. खरोखर मी माझ्या देहाला सांभाळले नाही तितके तात्याला सांभाळतो असे म्हणाले".

नंतर नामस्मरणासंबंधी गोष्टी निघाल्या. पू. बाबा म्हणाले की आपल्याला नाम दृश्याइतके खरे वाटत नाही. स्वामी रामदास युरोपात गेले होते तेव्हां एकदा नामाबद्दल म्हणाले, "you think the world is real; feel that Nam is as real as the world. Nam is the Reality." आपल्याला शंभर रुपयाची नोट खरी वाटते पण नाम खरें वाटत नाही.

**साधक ग** : ह्याचे कारण व्यवहारात नोटेला common acceptability आहे तशी नामाला नाही.

**साधक प** : दिवसाचा बहुतेक सर्व काळ आम्ही नोट खरी मानणारांमधेच असतो. कायम सत्संग झाला तर नाम खरें वाटेल.

**पू. बाबा** : नामस्मरण नीट व्हावे म्हणून नामाची प्रार्थना करावी.

**साधक ग** : आम्हाला नामापेक्षा रूपाची कल्पना करणे सोपे जाते. त्यामुळे श्रीमहाराजांची प्रार्थना करणे समजू शकते पण नामाची प्रार्थना समजू शकत नाही. नाम आणि श्रीमहाराज एकच ह्या अर्थाने तत्त्वत: महाराजांची प्रार्थना म्हणजे नामाचीच प्रार्थना म्हणता येईल.

**पू. बाबा** : एरवी असाध्य वाटणाऱ्या गोष्टी चिंतनाने साध्य होतात. आपण सतत नामाचे चिंतन करावे.

**साधक क** : चिंतन करताना हेतू जितका स्थूल असेल तितके साध्य लवकर साधते. नामाच्या बाबतीत तर ते सूक्ष्म आहेच पण आमचा हेतूही स्पष्ट नाही. त्यामुळे नामाचे चिंतन अवघड होते.

**पू. बाबा** : श्री. भाऊसाहेबांना (केतकर) शेवटी शेवटी सतत श्रीमहाराज आले आहेत असा भ्रम होत असे. सुनेला म्हणत, 'यमने, महाराज आले आहेत. त्यांना बसायला पाट दे.' खरोखर हा भ्रम म्हणायचा की दिव्य स्थिती!

## |७२| (१७ मार्च १९८९)

आज सकाळी १० वाजता कॉटवरून उतरताना पू. बाबा खाली पडले. त्यामुळे त्यांच्या पाठीला, कंबरेला आणि उजव्या पंजाला मार लागला आहे. दुपारी ताप आला होता. पण इतके होऊनही ते प्रसन्न आहेत.

आजाराच्या संदर्भात पू. बाबा म्हणाले, सकाळी कॉटवरून पडल्यावर उठता येईना. पण पहिला विचार मनात आला की चालले आहे ते सगळे बरोबर चालले आहे. श्रीमहाराजांच्या इच्छेनुसार सर्व घडत आहे. डोक्यात ब्रह्म आणि त्याची शक्ती याबद्दल जो विचार आधी चालू होता तो तसाच चालू राहिला आणि देहदु:खाकडे लक्ष गेले नाही. नुसत्या विचाराने जर मनुष्य देहदु:ख विसरतो तर नाम हे त्याच्याही पलीकडे आहे. त्यामुळे जो नामात राहील त्याला देहदु:ख नाही.

पू. बाबा पुढे म्हणाले आज नागपूराहून डॉ. सोनारांचा फोन आला होता. ते नुकतेच प्रयागच्या कुंभमेळ्याला गेले होते. तेथे त्यांना देवहरबाबा नांवाचे एक सत्पुरुष भेटले. ते म्हणाले की सध्याचा काळ इतका भ्रष्ट आचाराचा

आहे की त्यात अमूक एक साधन करावे म्हटले तर त्यासाठी अनुकूल परिस्थिती मिळणार नाही. अशा वेळी नामस्मरण हेच सर्वश्रेष्ठ साधन आहे.

श्रीमहाराज परमेश्वर प्राप्तीसाठी वयाच्या आठव्या वर्षी घर सोडून गेले होते. त्या संदर्भात ते पुढे एकदा म्हणाले की अशी माणसे घराबाहेर पडली नाहीत तर त्यांना परमेश्वर प्राप्ती होत नाही असे नाही. पण विधिघटनाच तशी असते.

एकदा काशीचे एक पंडित आले होते. त्यांचे हिंदी बोलणे मी श्रीमहाराजांना मराठीत सांगत होतो. मी श्रीमहाराजांना म्हणालो की तुम्ही इतके वेळा काशीला जाऊन आलात, मग तुम्हाला हिंदी कसे येत नाही? त्यावर श्रीमहाराज म्हणाले की माझे मोडके तोडके कामचलाऊ हिंदी आहे; पंडितांशी बोलता येण्यासारखे नाही.

इंदूरचे भय्यासाहेब मोडक गर्भश्रीमंत. पण म्हातारपणी घरातून बाहेर निघण्याची पाळी आली. ते पुण्याला आण्णासाहेब मनोहरांकडे आले होते. संध्याकाळी एका मंदिरात तुलसीरामायण सांगत व त्यातील प्रसंगास अनुरूप अशी एखादी श्रीमहाराजांची गोष्ट नंतर सांगत. रात्री झोपतांना म्हणत की वा! महाराज मला किती आनंदात ठेवले आहे. त्यांची परिस्थिती लक्षात घेता हे कसे काय म्हणून श्री. आण्णासाहेबांनी विचारल्यावर ते म्हणाले, 'मी महाराजांपाशी लबाडी कशी करेन!'

**साधक प** : आपण कशासाठी जगतो असा विचार केला की निश्चित असे काहीच उत्तर मिळत नाही.

**पू. बाबा** : अती वाचनाने विकल्प वाढायची शक्यता असते.

## |७३| (२४ मार्च १९८९)

पू. बाबांचा उजवा पंजा आता ठीक आहे. अद्यापि थोडी सूज आहे. कंबर आणि पाठ अजून दुखतात पण ताप यावयाचा थांबला आहे. न्युमोनियासाठी अँपीसिलीनची इंजेक्शने दिली त्यामुळे अंगात उष्णता फार वाटते असे पू. बाबा म्हणाले.

पू. बाबांनी श्रीमहाराजांच्या एका साधनी भक्तांची हकिगत सांगितली. श्री. दिनकरराव केतकर नुकतेच गोंदवल्यास जाऊन आले. त्यांनी सांगितले की या भक्तास हृदयाचा आजार आहे. (Dialated Heart). खूप चिडचीड करतात. पू. बाबा म्हणाले वास्तविक त्यांनी नामासाठी घरसंसार सोडला. गेली सात वर्षे तर ते गोंदवल्यास राहून अखंड नामस्मरण करीत आहेत.

**साधक ख** : त्यांना सत्संगही खूप झाला आहे. (प्रथम पू. तात्यासाहेबांचा व नंतर पू. बाबांचा) आणि तरी अशी चिडचीड का होते?

त्यांची खरी आतली स्थिती कोण सांगणार! तथापि चर्चेत दोन निष्कर्ष निघाले.

१) नाम अखंड घेतले तरी ते समजून घेतले, वृत्तीवर लक्ष ठेवून घेतले तर ते लवकर काम करते.

**साधक ब** : ही समस्या केवळ त्यांची नसून खरोखर आमची सर्वांची आहे. एक म्हणजे अखंड नामस्मरण होत नाही. पहाटे, रात्री वगैरे ठरवलेल्या वेळी होते पण मधल्या वेळात होत नाही आणि तसे ते होत नाही याची क्वचित रुखरुख वाटते.

दुसरे म्हणजे वृत्तीवर लक्ष ठेवून ज्याचे नाम होत नाही त्याचे ते नाम घेणे फुकट जाते काय?

**पू. बाबा** : पहिल्या - म्हणजे अखंड नामस्मरण न होणे पण त्याची रुखरुख वाटणे - बाबतीत विचार करावा लागेल.

दुसऱ्या - म्हणजे वृत्तीवर लक्ष न ठेवता घेतलेले नाम - बाबतीत लक्षात ठेवा की नाम कधीच फुकट जात नाही.

मी 'नामसाधना' हे पुस्तक लिहिले त्यावेळी पुढे वैखरीतील नाम थांबते असे लिहिले होते पण श्रीमहाराज म्हणाले की तसे लिहू नका. लोक तेवढेच सत्य धरून चालतील.

२) ह्या साधनी भक्तांच्या बाबतीत दुसरी शक्यता अशी की त्यांच्या वागण्यात चिडचीड दिसत असली तरी ती केवळ देहाच्या पातळीवर असू शकेल. आतून ते 'स्वस्थ' असतील. भगवान रमण महर्षींची हाताची जखम दुखू लागली की ते 'हाय' असे करीत. पण म्हणून ते त्या देहदु:खात गुंतलेले नव्हते. त्या दु:खाकडे ते साक्षीपणाने पहात होते.

नंतर पू. बाबांनी एक वेगळा मुद्दा मांडला. ते म्हणाले, आमचे व्यवहारातील वस्तूंवाचून नडते. उदाहरणार्थ - पेन, चष्मा. तसे नामावाचून अडते का?

**साधक ग** : व्यवहारातील स्थूल वस्तूंचा आम्हाला अनुभव आहे तसा सूक्ष्माचा अनुभव नाही.

**साधक प** : आपली स्मृती सूक्ष्म आहे. ती जाऊ लागली तर आपले अडते.

**पू. बाबा** : सूक्ष्माच्याही आपल्याला पायऱ्या कल्पाव्या लागतील. मन सूक्ष्म पण बुद्धी मनाहून सूक्ष्म आणि आत्मतत्त्व बुद्धीहूनही सूक्ष्म. वृत्ती सूक्ष्म

असतात. तेथे नाम पोहोचले म्हणजे मगच नामावाचून अडते हे लक्षात येईल. व्यवहारात आणि सुरुवातीला परमार्थात अहम् व मम पाहिजे ,पण त्यापासून अहंकार व ममत्व येऊ नये कारण त्यांच्याबरोबर परमार्थापासून दूर नेणारा सगळा गोतावळा येतो. शरीराचे धारण पोषण इत्यादी अपरा प्रकृती करते. तिच्या मागे परा प्रकृती आणि तिच्याही मागे ईश्वरी संकल्प असतो. म्हणून जे काही घडते ते ईश्वरी संकल्पानुसार घडते हे नेहमी लक्षात ठेवले तरच राम कर्ता हा भाव दृढ होईल.

आमच्यापैकी एका साधकांना Heart trouble असूनही ते स्वस्थचित्त आहेत याचे आता त्यांच्या घरातील माणसांनाही आश्चर्य वाटते, तर आपले साधन चांगले होत नाही अशी त्यांना खंत वाटते. हा complex च कित्येकदा कार्याला चालना देतो. (साधकांना उद्देशून) तुमचे खरोखर छान चालले आहे. आमच्या मागून तुम्ही आमच्या पुढे जाल.

जगातील सर्व गोष्टी ईश्वरी संकल्पानुसार चालतात. एकदा मी श्रीमहाराजांना विचारले की कोण कुठून, कोण कुठून अशी काही विशिष्ट माणसेच तुमच्याकडे का आली? श्रीमहाराज म्हणाले, ते का हे कसे सांगता येईल? पुढे म्हणाले, समुद्रात कितीतरी जलचर आहेत पण कोळ्याने जाळे टाकले की त्यातले काही मासेच त्याच्या जाळ्यात कां सापडतात आणि तेच का सापडतात याचे उत्तर प्रारब्धाखेरीज काय देणार? ह्या संदर्भात पू. बाबांनी ब्रिटॉनच्या Personal Idealism चा उल्लेख केला.

एका ख्यातनाम आणि चिकित्सक मराठी लेखिकेने श्री. बापूराव टिळकांना पू. बाबांच्या 'संतांचें आत्मचरित्र' ह्या पुस्तकाचे परीक्षण लिहिण्यास नकार दिला. त्या म्हणाल्या की खरोखर मराठीत असे पुस्तक नाही; पण आमची दोषदृष्टी असते म्हणून परीक्षण नको. त्यांनी श्रीमहाराजांचे आत्मचरित्र पुन: पुन्हा वाचले आणि त्यांना ते अतिशय आवडल्याचे त्यांनी सांगितले.

**साधक** : प्रूफस् पाहताना तुम्ही विचारले होते तेव्हां मीही हेच म्हणालो होतो.

**पू. बाबा** : या लेखिकेला आवडले हे विशेष. आपल्या गुरूंचे चरित्र आपल्याला आवडणारच.

**साधक ज** : हे पण ममत्वच नाही कां?

**पू. बाबा** : हे दिव्य ममत्व आहे. ते येवो अशी प्रार्थना करूया. हे ममत्व श्री. भाऊसाहेबांजवळ होते. आपल्या स्वत:च्या घरी देखील ते श्रीमहाराजांचे

घर म्हणून राहिले होते. जेवताना पंगतीत मला दक्षिणा दिल्यावर त्यांनी मला दक्षिणा नाही का म्हणून दक्षिणा मागितली होती!

स्वामी रामदासांनी म्हटले आहे की त्यांनी like a machine नाम घेतले. त्यांच्यासारखे नाम घ्यावे पण ते mechanical कंटाळवाणे होऊ देऊ नये.

**|७४|** (३१ मार्च १९८९)

**पू. बाबा** : आज एक संन्यासी भेटायला आले होते. आर्यसमाजी आहेत. पत्नीच्या मृत्यूनंतर संन्यास घेतला. कोकणात एका खेड्यात राहतात. ते म्हणाले की मी एकांतात राहतो आहे पण त्या एकांतात मला सुख वाटत नाही. लोकात जावेसे वाटत नाही; पण एकांतातही जीव रमत नाही. मी त्यांना नामस्मरणासंबंधी सुचवले तेव्हा ते म्हणाले, योग याग, पारायणे, सप्ताह इत्यादी सोपे आहे पण नामस्मरण फार कठीण आहे. म्हणाले, तुम्ही डोक्यावर हात ठेवा. मी म्हणालो, तुम्ही संन्यासी, तुम्हीच आम्हाला आशीर्वाद द्यायचा! ते मोठे प्रामाणिक वाटले. आता तुम्हाला विचारतो, खरेच नामस्मरण इतके कठीण आहे कां?

श्रीमहाराज म्हणत की नामस्मरण करतो म्हणजे कुंडलिनी जागृत झालेली असलीच पाहिजे. नामस्मरण होत नाही याचे कारण नाम खरें वाटत नाही. गुरूंनी दिलेले नाम श्रद्धेने घेतले पाहिजे. गुरूंपेक्षाही त्यांनी दिलेल्या नामाचा जास्त आधार वाटला पाहिजे. विल्यम जेम्स म्हणतो की माणसाला चार प्रकारचा आधार वाटतो. १) परिस्थिती २) पैसा ३) आपण जोडलेली माणसे ४) गाईडचे (मार्गदर्शक-गुरु) आश्वासन. गाईडपेक्षाही त्याच्या शब्दावर जास्त विश्वास असतो. रामचरितमानसमधे तुलसीदासांनी नामावर भर दिला आहे. नामाचे महत्त्व सांगताना ते म्हणतात, 'ब्रह्म राम तें नामु बड़ बरदायक बरदानी।' ते म्हणतात की ही अतिशयोक्ती नाही. 'कहौ कहाँ लगि नाम बड़ाई। रामु न सकहिं नाम गुन गाई॥'

विनय पत्रिकेतही तुलसीदासांनी नामावर भर दिला आहे. भगवी वस्त्रे धारण केली म्हणजे संन्यास होतोच असे नाही. भगवे वस्त्र हे प्रतीक आहे. संकल्प नाशी तो संन्यासी असे एकनाथ महाराजांनी म्हटले आहे.

स्वामी रामदासांनी नामस्मरणात जीवन झोकून दिले कारण त्यांना केवळ तेच सत्य वाटले. आतला आवाज हा परमेश्वराचा किंवा सद्गुरूंचा आवाज

असतो. तो शब्दमय असेलच असे नाही. पण सामान्यत: विचार आणि शब्द बरोबर येतात. याचे दोन अनुभव सांगतो.

१) अलिकडे गोंदवल्यास श्रीमहाराजांच्या पुण्यतिथीच्या दिवशी (२ जानेवारी १९८९ मार्गशीर्ष व. १०) पहाटे निरूपण करीत होतो. समोर तीस-चाळीस हजार माणसांचा समाज होता. निरूपण करीत असतांनाच मला "सर्वांना येथून समाधान घेऊन जायला सांगावे" असे शब्द ऐकू आले.

२) १९५६-५७ मधे श्रीमहाराजांचे चरित्र लिहिण्यासाठी बरीच सामग्री गोळा केली होती. एक दिवस संध्याकाळी घरी येऊन आंघोळ केल्यावर आतून चरित्र लिही अशी आज्ञा आली आणि लगेच बसून एका बैठकीत चरित्राचा आराखडा तयार करता आला.

नंतर पू. बाबांनी दोन आठवणी सांगितल्या.

१) अकबर हैदरी हा हैदराबादच्या निजामाचा अकौटंट जनरल होता. त्याचा मित्र नवाब बिलग्रामी याच्याकडे पेशव्यांकडचे स्फटिकाचे शिवलिंग होते. तो रोज त्याची पूजा करीत असे. एकदा अकबर हैदरी आणि बिलग्रामी पॉंडेचरीला योगी अरविंदाना भेटायला गेले तेव्हा अकबर हैदरीला त्यांनी आशीर्वाद दिला. पुढे तो निजामाचा मुख्य प्रधान झाला. त्याला 'सर' पदवीही मिळाली.

२) मालाडला येणाऱ्या एक भगिनी पॉंडेचरीला 'मदर'ची आधी अपॉइंटमेंट घेऊन भेटायला आपल्या काही मैत्रिणींसह गेल्या. मदरनी इतरांची फक्त विचारपूस केली व या भगिनीना मात्र जवळ बसवून त्यांच्या पाठीवरून हात फिरवून आशीर्वाद दिला.

ह्या आठवणी सांगून पू. बाबा म्हणाले की सत्पुरुषांना कोणी भेटला की त्याची आध्यात्मिक स्थिती काय आहे हे दिसते-समजते. आपण शासनाची सत्ता मानतो तशी परमेश्वराची सत्ता का मानत नाही? जे जे घडते ते ते त्याच्या सत्तेने घडते अशी मनाला नेहमी शिकवण द्यावी; कारण राम कर्ता हा भाव दृढ झाला म्हणजेच सर्व सोपे होईल. नुसती चर्चा उपयोगाची नाही. साधन वाढले पाहिजे. त्याकरता अभ्यास हवा. ते करतील, त्यांनी करावे म्हणून रडण्यात अर्थ नाही. इतर सर्व गोष्टी मी करतो आणि साधन मात्र गुरूंनी करवून घ्यावे असे म्हणणे हा दुटप्पीपणा झाला.

साधक अ म्हणतात की नाम घेणाऱ्याचे मागे मी उभा आहे हे श्रीमहाराजांचे आश्वासन खरोखर पुरेसे आहे.

अलिकडे न्युमोनियाने आजारी होतो तेव्हा एक्सरे पाहून डॉ. देशपांडे घाबरले. त्यांना वाटले की हा आजार साधा नाही. मी त्यांना म्हणालो, 'डॉक्टर घाबरू नका, तुम्हाला अपयश येणार नाही,' त्यावेळी रात्रंदिवस मला समोर गुलाबी प्रकाश दिसत असे.

**।७५।** (७ एप्रिल १९८९)

काल गुढीपाडवा होता. दुपारी ३ वाजल्यापासून रात्री ९ वाजेपर्यंत पू. बाबांना भेटण्यास पुष्कळ माणसे येऊन गेली. इतका वेळ बसावे लागले त्यामुळे पू. बाबांची पाठ व कंबर दुखत होती. पू. बाबा आम्हाला म्हणाले, ह्या त्रासाचे राहू द्या; महत्त्वाचे म्हणजे भेटावयास आलेला प्रत्येकजण संसारासंबंधीच बोलत होता; देवाबद्दल साधनाबद्दल कोणीच नाही. श्रीमहाराज म्हणत की प्रापंचिक विषयाच्या गोष्टी बोलतांना माझे ओठ करपतात; आणि मला तर नेहमी तेच करावे लागते. ते असे का म्हणत असत ते आता समजू लागले आहे.

नंतर पू. बाबांनी ज्ञानेश्वरीच्या बाराव्या अध्यायातील एक ओवी नेमका काय अर्थ असावा याची चर्चा करण्यासाठी घेतली. ओवी अशी :

वन्हीची ज्वाला जैसी। वायां जाय आकाशीं।
क्रिया जिरो दे तैसी। शून्यामाजी॥ १२-१३३॥

**साधक प** : ही ओवी संदर्भासह विचारात घेतली पाहिजे.

'मदर्थमपि कर्माणि कुर्वन् सिद्धिमवाप्स्यसि।' असे भगवंतांनी सांगितले व पुढे म्हणाले 'अथैतदप्यशक्तोसि कर्तुं मद्योगमाश्रित:। सर्वकर्म फलत्यागं तत: कुरु यतात्मवान्॥ १२-११॥' ह्या श्लोकावरील भावार्थ सांगताना 'आणि जेणें जेणें वेळें। घडती कर्मे सकळें। तयांची तियें फळें। त्यजित जाय॥ १२-१२८॥' असे सांगून मग ३-४ दृष्टांत देतानां ही ओवी आली आहे. त्यानंतर म्हटले आहे, 'अर्जुना हा फळत्यागु। आवडे कीर आसलगु। परीं योगामाजीं योगु। धुरेचा हा॥ १२-१३॥''

**साधक ग** : येथे कर्म न म्हणता क्रिया शब्द योजिला आहे. अहंकाररहित कर्माला क्रिया म्हणता येईल. उदाहरणार्थ - पचनक्रिया, हृदयक्रिया, शून्य म्हणजे नेमके काय? No thing म्हटले तरी Nothing exists.

**साधक प** : मला वाटते, हे क्षणिकवादाचे उदाहरण आहे.

**साधक ग** : क्रिया शून्यात जिरणे हा अनुभव आहे. ज्ञानदेव हा अनुभव

शब्दात आणू पहात आहेत आणि त्या शब्दांचा आधार घेऊन अनुभव नसलेले आम्ही तो अनुभव कल्पनेने जाणण्याचा प्रयत्न करतो! वास्तविक हे सांगताना ते वरून खाली पहात आहेत.

एकदा ज्ञान झाले की कर्म संपते. अहंकाररहित कर्म शक्य आहे काय?

**पू. बाबा** : संतांचे कार्य अहंकाररहित असते. म्हणून त्यांची संगत पाहिजे.

श्रीमहाराज एकदा म्हणाले, भगवान एकदा म्हणतात की 'अवजानन्ति मां मूढा: मानुषीं तनुमाश्रिताम्।' आणि पुन्हा 'भजस्व माम्' म्हणूनही सांगतात. पुढे आपणच म्हणाले, बाकी ही वकिली बरोबरच आहे कारण सांगणारा मानव रूपात असतांना त्याला भजस्व माम् असेच म्हणावे लागणार!

**साधक ग** : गीतेतल्या एका गोष्टीची गंमत वाटते. अर्जुनाला गीता सांगणारा श्रीकृष्ण त्याचे सारथ्य करीत होता तर व्यासकृपेने रणांगणावरील वृत्तांत - त्यात गीता पण आलीच - धृतराष्ट्राला सांगणारा संजयही त्याचा सारथी होता! गीता ऐकून अर्जुनाचा मोह नाहीसा झाला. पण कृष्णाने सांगितलेली गीताच संजयाने धृतराष्ट्राला सांगूनही त्याचा मोह (पुत्रस्नेहें मोहितु) तसाच राहिला! म्हणूनच श्रीकृष्णांनी 'इदं ते नातपस्काय ना भक्ताय कदाचन। न चाशुश्रूषवे वाच्यं न च मां योऽभ्यसूयति॥' असे म्हटले असावे.

सिद्धींसंबंधी बोलणे निघाले तेव्हां साधक क यांनी श्रीरामकृष्णांनी सांगितलेली एक गोष्ट सांगितली. एका माणसाने १२ वर्षे तपश्चर्या करून पाण्यावरून चालण्याची सिद्धी मिळवली. मोठ्या दिमाखाने त्याने त्याच्या गुरूंना पाण्यावरून चालत नदीच्या पलीकडे जाऊन परत कसे येता येते ते दाखवले. त्याचे गुरु म्हणाले, बारा वर्षे तपश्चर्या करून तू केवळ दोन पैशांची विद्या मिळवलीस. दोन पैसे दिले की नावेतून नदी पार करता येते.

निसर्गदत्त महाराज म्हणाले की एकदा लक्षात आले की सगळ्या गोष्टी परमेश्वराच्या योजनेप्रमाणे होतात. आणि त्यामुळे कर्मातील अहंकार गेला आणि कोणताही ताण उरला नाही.

**साधक प** : जागे झाले की स्वप्नाचे खोटेपण समजते तसे आत्मज्ञान झाल्यावरच जग मिथ्या आहे हे लक्षात येईल; त्यानंतरच क्रिया शून्यात जिरते म्हणजे काय ते समजेल.

## **।७६।** (१४ एप्रिल १९८९) रामनवमी

आज रामनवमी असल्यामुळे बरीच मंडळी पू. बाबांना भेटावयास येत

होती. भावनगरचे एक गृहस्थ - क्ष भेटावयास आले. त्यांच्याबरोबर मुंबईची दोन माणसे होती. क्ष म्हणाले की सुमारे दीड वर्षांपूर्वी श्री दिनकरराव केतकरांबरोबर ते आले होते आणि त्यावेळी त्यांचे नामस्मरण चांगले होईल असा पू. बाबांनी त्यांना आशीर्वाद दिला होता. तेव्हांपासून त्यांचे नामस्मरण उत्तम चालू आहे. ते म्हणाले की पू. बाबांकडे आले की जराशी डाउन झालेली बॅटरी पुन्हा चार्ज होते.

त्यांनीच भावनगरच्या एका वृद्ध गृहस्थांची हकिगत सांगितली. ते वृद्ध गृहस्थ गुरूच्या शोधात होते; अस्वस्थ होते. मुलगे नीट वागवत नसल्यामुळे ते व त्यांची पत्नी एका वृद्धाश्रमात रहात होते. पत्नी नेहमी आजारी असे. ह्या गृहस्थांना क्ष नी महाराजांच्या प्रवचनांचे गुजराथी भाषांतर वाचावयास दिले. त्यांनी मोठ्या श्रद्धेने त्या ग्रंथाची नऊ नव्हान्न पारायणे केली. नंतर 'माझे काम झाले. माझे समाधान झाले' असे सांगून त्यांनी ते पुस्तक परत दिले. तेव्हांपासून ते अखंड नामस्मरण करू लागले, यावेळी ते सुमारे ७६ वर्षांचे होते. नंतर एक दिवस त्यांनी सांगितले की मी आता १५ दिवसांनी जाणार आणि त्याप्रमाणे खरोखरच १५ दिवसांनी त्यांनी देह ठेवला. शेवटपर्यंत त्यांचे नामस्मरण चालू होते. मृत्यूपूर्वी अर्धा तास ते क्ष ना म्हणाले की मी अतिशय आनंदात आहे.

**पू. बाबा** : पहा, कोणाचे साधन कसे होते ते! ह्या गृहस्थांना ग्रंथात गुरु सापडला आणि त्यांनी संपूर्ण शरणभावाने आज्ञापालन केले. गुरुआज्ञा पालन म्हणजे गुरूंना जे आवडते ते करणे. आपल्या गुरूंना तीन गोष्टी आवडतात : १) अखंड नामस्मरण २) अन्नदान आणि ३) सगुणाचे प्रेम.

सध्या अठराव्या अध्यायातील 'विविक्तसेवी लघ्वाशी' ह्या श्लोकावरील 'आणि परपुरुषें कामिली। कुळवधू आंग न घाली। निद्रालस्या न मोकली। अशन तैसें॥' ह्या ओवीवरील निरूपण चालू आहे. ह्या ओवीचा उल्लेख करून पू. बाबा म्हणाले की साधनाच्या आड येणाऱ्या कोणत्याही मोहाला बळी पडू नये, इतकेच नव्हे तर तो अधर्म समजावा. झोप व आळस येईल असे साधकाने अन्न घेणे म्हणजे कुलवधूने बाजारबसवी होण्यासारखे आहे!

## |७७| २१ एप्रिल १९८९

**पू. बाबा** : तुकाराम महाराज 'आवडे हें रूप' ह्या अभंगात 'आतां दृष्टीपुढे ऐसाचि तूं राहे। जो मी तुज पाहे पांडुरंगा॥' असे म्हणतात. निर्गुण आणि

सगुण यांचा विचार करतांना सगुणाचे प्रेम कसे असते याचे उदाहरण म्हणून गुरुदेव रानड्यांनी हा अभंग दिला आहे. ईश्वर रसमय आहे. 'रसौ वै सः।' सगुणाची भक्ती करतांना तुकारामांना दिसणारा पांडुरंग हा दगडाचा नव्हता; कारण दगडाचा पांडुरंग एकसारखा दृष्टीपुढे कसा राहील? भक्त पृथक्पणे भगवंतावर प्रेम करतो; त्याच्यापासून वेगळा असतो तेव्हा भक्तिरस असतो. पण तो त्या रसात विलीन झाला, द्वैत संपले की तेथे केवळ शांतरस असतो. खरा भक्त द्वैतातील सुख भोगतो. 'तूं देव मी भक्त ऐसें करी।' असे म्हणतो. भक्तीत अनन्यता आहे. आपणाला नाम खरें वाटत नाही. गुरु देहात होते तेव्हां ते 'होते', आता नाहीत असे वाटते. वास्तविक खिशातली एखादी वस्तू जितकी खरी वाटते तितके नाम खरें वाटले पाहिजे. ते पवित्र आहे. शक्तिमय आहे असे वाटले पाहिजे.

**साधक प** : असे अद्यापिही न वाटणे हे मानसिक अनारोग्यच म्हटले पाहिजे. आपल्या देहाच्या आजारांबद्दल जसे आपण बोलतो तसे मानसिक आजारांबद्दल बोलत नाही. त्याबाबतीत गुप्तता पाळतो. सर्व सुखे भोगून देखील वैफल्य येते. माणसाने स्वतःचे एक 'इमेज' तयार केलेले असते व ते भंगण्याची त्याला भीती वाटते. जग भोगवादी बनत चालले आहे. त्यातून चिरस्थायी सुख मिळणे शक्य नाही. त्यासाठी अंतर्मुख झाले पाहिजे. संतांनी यावर स्पष्ट मानसिक विवरण केलेले कोठे आढळत नाही. वासना आणि विषय यात काय फरक आहे? विषय कशाला म्हणायचे?

**पू. बाबा** : श्रीमहाराजांनी विषयाची फार सोपी व्याख्या केली आहे. भगवंताखेरीज जे जे आहे ते सर्व विषय. या विषयांच्या द्वारा आपण आपल्या वासना पूर्ण करण्याची धडपड करतो. श्रीमहाराज म्हणत, 'वासनेचा क्षय भगवंताच्या नामामधें आहे.' त्यांचे आणखी एक वचन आहे, ''पाणी माती एक झालें। वेगळें नाहीं करता आलें।। निवळी घालावी पाण्यांत। पाणी स्वच्छ होतें जाण।। तैसा विषयांत राहून जगतीं। नामाची ठेवावी संगती।। विषयाचें विष शोषून घेई। ऐसी आहे नामाची प्रचीती।।''

संतसंग मिळणे कठीण आहे पण नामाची संगत वाढविण्याचा अभ्यास केला पाहिजे आणि त्यासाठी विवेक आणि वैराग्य पाहिजे.

**साधक ग** : आज आणखी नको असे वाटले तरी आहे ते टिकावे, त्यात खरी सुरक्षितता आहे असे वाटते. श्रीमहाराज म्हणजे सुरक्षितता असे वाटत नाही. जोपर्यंत झोकून द्यावयाची तयारी होत नाही तोपर्यंत आमचे नामस्मरण

वरवरचे आहे. वास्तविक श्रीमहाराजांना गुरु म्हटले, ते कर्तुमकर्तुम् समर्थ आहेत म्हटले की कसलीही भीती अथवा असुरक्षितता वाटता कामा नये. उरलेल्या आयुष्याची चिंता वाटू नये. पण तसे होत नाही.

**साधक प** : हा भाव प्रयत्न करून येत असावा, म्हणून कृष्णमूर्तींनी शाळा काढल्या. लहानपणापासून मुलांना परमार्थप्रवण करणे शक्य असावे. गुरुदेव रानड्यांच्या म्हणण्याप्रमाणे गुरुकृपेशिवाय परमार्थ शक्य नाही. तथापि शिष्याचा ध्यास व तळमळ हा त्या कृपेचा आधार आहे. तळमळ नसेल तर कृपा होऊनही फायदा होणार नाही.

## |७८| (२८ एप्रिल १९८९)

**पू. बाबा** : परवा बुधवारी एक गृहस्थ भेटायला आले होते. नाव विचारायचे राहून गेले. ते खूप नामस्मरण करतात. त्यांना आता असे होते की खूप वेळ नाम घेतले की शरीर गरम होते पण त्याचा त्रास होत नाही. आहार कमी झाला आहे आणि सात्विक आहाराची प्रवृत्ती वाढली आहे. मला म्हणाले की तुमच्याकडे पाहिल्यावर खूप नाम घ्यावे असे वाटू लागले आहे. यावरून एक जुनी गोष्ट आठवली. एकदा बाबूराव अंतरकरांनी श्रीमहाराजांना एक फोटो दाखवून विचारले की हा फोटो आपलाच का? त्यावर श्रीमहाराज म्हणाले की जो फोटो पाहून नाम घ्यावेसे वाटेल तो फोटो माझा. सेंट जोन ऑफ लिमा होती ती क्रूसावरील ख्रिस्ताचे (Christ in passion) ध्यान करी. हे करतांना तिच्या नसा फुगत. मन प्रसन्न होत असे. ध्यानामुळे पोट भरल्यासारखे वाटे व आहार कमी होई.

ह्या सर्व गोष्टींचा मुद्दा असा की सूक्ष्माचा स्थूलावर परिणाम होतो. नाम सूक्ष्मात ठसले की शरीरात त्याला अनुरूप असे फेरफार होतात. आज आपण स्थूलातून सूक्ष्मात जाण्याच्या प्रयत्नात आहोत.

**साधक प** : सेंट टेरेसाने सांगितलेल्या साधनाच्या चार पायऱ्यांपैकी पहिली पायरीच जास्त कठीण आणि परीक्षा करणारी आहे. या पायरीत मन गोळा करून हृदयात न्यावयाचे आहे. या पायरीवर असतांना आपण जे पाहिलेले आणि ऐकलेले असते ते आपल्याला त्रास देते. ते ईश्वरचिंतनाच्या आड येते. म्हणून या पायरीवर फार चिकाटी लागते.

**पू. बाबा** : आपण नाम घेतो पण ते जिवंतपणे येत नाही. धूर आहे पण आग पेटत नाही.

**साधक ड:** धूर नाहीसा होऊन आग पेटायला वारा पाहिजे. असा वारा कोणता?

**पू. बाबा** सत्संगाखेरीज धूर नाहीसा होऊन प्रखर निष्ठेची आग पेटणार नाही. श्रीमहाराज म्हणत की माणसाला कळते पण अविद्येचा जोर विलक्षण आहे. निष्ठा निर्माण होत नाही कारण आपण प्रवाहाच्या बाजूचेच आहोत. प्रवाहाच्या उलट जाण्यास जीवाची शक्ती कमी पडते. तथापि तळमळ लागली तर निष्ठा निर्माण होईल. परमात्म दर्शन हे सर्वोच्च मूल्य (Supreme Value) झाले पाहिजे. Value is for achievement. Supreme value is that after achieving which nothing remains to be achieved.

**साधक ग** : 'प' म्हणतात त्याप्रमाणे नामस्मरणाने आणखी काहीतरी साधावयाचे आहे असे आम्हाला वाटते आणि ते 'आणखी काहीतरी' काय आहे ते समजत नाही.

**पू. बाबा** : वास्तविक आपले सर्वांचे वय झालेले आहे. पैसाही पुरेसा आहे. आता काही दारिद्र्य येणार नाही. सर्वच उलटे-पालटे झाले तर गोष्ट वेगळी. तेव्हां आता इतर सर्व सोडून नामच घेईन असा निश्चय केला पाहिजे.

चर्चेच्या ओघात श्रीमहाराज, भाऊसाहेब, पू. तात्यासाहेब यांच्या गोष्टी निघाल्या तेव्हा पू. बाबा म्हणाले, निष्ठा पाहिजे भाऊसाहेबांसारखी, श्रीमहाराजांनी संसाराची जबाबदारी घेतली म्हटल्यावर त्यांनी त्याबद्दल कधी विचार किंवा चिंता केली नाही. धुळ्याला पू. तात्यासाहेबांचे बंधू श्री. आण्णा असत. त्यांच्या मुलीचे लग्न झाले व पुढे चार महिन्यांतच तिचा नवरा वारला. त्यावर भाऊसाहेब म्हणाले की श्रीमहाराज तिच्या अकल्याणाचे कसे करतील! तसेच त्यांना अंतर्गळाचा (हर्निया) त्रास होऊ लागला. डॉक्टरांनी ताबडतोब हॉस्पिटलमध्ये न्या म्हणून सांगितले. तात्यासाहेब परगावी गेलेले होते. भाऊसाहेबांनी मला (श्रीमहाराजांच्या तसबिरीसमोर उभे राहून) स्वारींच्या कानावर घालावे म्हणून सांगितले. फक्त थंड पाण्याच्या पट्ट्या ठेवल्या आणि ते बरे झाले! एकदा त्यांना विचारले की मरणाची भीती नाही का वाटत? ते म्हणाले भ्यायचे कशाला? इथून उठून श्रीमहाराजांकडेच जायचे आहे. असे श्रीमहाराजांचे सर्वव्यापित्व त्यांना जाणवत होते.

भाऊसाहेबांचे श्रीमहाराजांवरचे प्रेम हे गोपींच्या श्रीकृष्णावरील प्रेमासारखे होते. साधन करताना जग आपल्या आड येत नाही; आपणच आपल्या आड

येतो. सत्याऽनृते मिथुनीकृत्य जग चालते. जग खरें वाटते पण परमात्मा-नाम त्याहून खरा असे वाटले पाहिजे. असे वाटले तरच सगुणाचे प्रेम येऊन त्यातून निर्गुणात जाता येईल. अन्नदानाबद्दल बोलतांना एकदा श्रीमहाराज म्हणाले, फक्त आपण खाणे ही देहबुद्धी आणि दुसऱ्याला खायला घालणे ही देवबुद्धी समजावी.

## ।७९। (५ मे १९८९)

**पू. बाबा** : आपण दर शुक्रवारी चर्चा करतो, पण साधनात प्रगती झाली नाही तर ही सगळी चर्चा निष्फळ आहे. आपण स्वत:ला झोकून देत नाही. सगळे कसे मिळमिळीत चालते. श्रीमहाराज म्हणत मध्यम स्थितीतील माणसांचे सगळेच मध्यम. त्यांचा स्वार्थही मध्यम आणि परमार्थही मध्यम. आपण ह्याच्या पलीकडे गेले पाहिजे.

निसर्गदत्त महाराज आणि साधक यांच्यातील काही संवाद पू. बाबांनी वाचून दाखविले. त्यांचा सारांश असा : १) नाममंत्राला नाद आहे. त्याचे साधकाभोवती वलय तयार होते. हा नाद साधकाच्या सूक्ष्म व कारणदेहापर्यंत जातो. नाममंत्र हा संतांनी तयार केलेला रस्ता आहे. ह्या रस्त्यावरून बिनधोक जावे. तो आत्मदर्शन घडवील. पू. बाबा म्हणाले की गेल्या वर्षी गोंदवल्याच्या उत्सवाला निरूपणासाठी जात असताना त्यांच्याभोवती पंख्यासारखे एक चक्र फिरत आहे असे काही काळ त्यांना वाटत होते. ते म्हणाले, हा नामस्मरणाचा परिणाम असावा.

२) नाम हा मार्गही आहे आणि ध्येयही आहे. निसर्गदत्त महाराज म्हणाले की मी एक सामान्य माणूस. विशेष शिकलो नाही पण गुरुवचनावर दृढ विश्वास ठेवला. त्यांची आज्ञा प्रमाण मानली आणि तीन वर्षांत मला आत्मदर्शन झाले. त्यामुळे आत्मदर्शनासाठी जवळचा मार्ग, लांबचा मार्ग असे काही नाही. ज्या प्रमाणात तुमची तळमळ असेल त्या प्रमाणात मार्ग जवळचा किंवा लांबचा होईल. तळमळ हा साधनाचा प्राण आहे. ती नसेल तर नामस्मरण निर्जीव होईल.

पू. बाबा म्हणाले, तुकोबा म्हणाले आहेत 'विधवेसी एक सुत। अहर्निशी तेथें चित्त॥ तैसा तूं मज एकला। नको मोकलू विठ्ठला॥' असे कळवळून नाम घेतले तर पांडुरंग दूर नाही. आपल्याला ही तळमळ का वाटत नाही? वास्तविक आता सगळा संसार झाला. उद्या कोणी खूप पैसा देतो, नाम सोड

म्हटले तर आपण तयार होणार नाही हेही खरें; तथापि अखंड नामस्मरण होत नाही. नाम हेच सत्य आहे असे आतून येत नाही. नामाकरिता नाम म्हणजे काय याचा बोध होत नाही. व्यवहारात कर्म करून दुसरे काहीतरी मिळवतों तसे नाम घेऊन दुसरे काहीतरी मिळवावयाचे आहे असे वाटते.

ह्या बाबतीत श्री. भाऊसाहेब केतकर हे आदर्श होते. नाम कां घेता? श्रीमहाराजांना आवडते म्हणून! यापलीकडे ते तत्त्वज्ञानाच्या अरण्यात शिरले नाहीत. मी एकदा त्यांना दासबोध वाचून दाखवत होतो. त्यात ओवी होती - 'मूर्खामाजीं परममूर्ख। जो संसारी मानी सुख। या संसार दु:खाएवढे दु:ख आणीक नाहीं॥ ओवी ऐकून भाऊसाहेब म्हणाले की श्रीसमर्थ असे म्हणताहेत त्याअर्थी ते खरे असलेच पाहिजे. पण माझा अनुभव तरी तसा नाही. रात्री मी हे श्रीमहाराजांना सांगितले. तेव्हा श्रीमहाराज म्हणाले, समर्थ आणि भाऊसाहेब दोघेही बरोबर आहेत. भाऊसाहेबांनी आपला संसारच दुसऱ्याला देऊन टाकला. मग दु:ख कोठे राहिले!

**साधक ज** : साक्षात्कार म्हणजे काय?

**साधक ब** : समुद्राच्या काठी वाळू संपते आणि पाणी सुरू होते. आत्ता पाय वाळूवर होता आणि आता पाण्यात आहे; असे काहीतरी ते असावे. आत्मसाक्षात्काराकडे जाणे ही process असली तरी आत्मसाक्षात्कार ही event असावी.

ह्यासंबंधी पू. बाबा काहीच बोलले नाहीत.

नंतर जीवनातील सर्वोत्तम मूल्यासंबंधी Supreme value बोलणे चालू असतांना पू. बाबा म्हणाले की अखंड नामस्मरण हेच उरलेल्या आयुष्याचे लक्ष्य ठरले पाहिजे. जगतो का? तर नामासाठी. असे आतून वाटले पाहिजे. नामच प्रपंचाची वासना कमी करील. मृत्यूची भीती कशासाठी? देह गेला तरी वासनांचे गाठोडे बरोबर येतेच; निदान ते गाठोडे सद्‌वासनांचे असावे. नाम वृत्तीपर्यंत खोल गेले पाहिजे. म्हणजे मग उठेल ती वृत्ती नामाचीच असेल. असे जेव्हां होईल तेव्हांच नामस्मरण घडेल. केवळ विचाराने किंवा तीव्र भावनेने हे होणार नाही. विवेक पाहिजे आणि त्याला वैराग्याची जोड अतिशय आवश्यक आहे. वैराग्य आले नाही तर नामस्मरणाने संसाराची आसक्ती कमी होईल पण त्यासाठीच खूप नाम खर्ची पडेल. यासाठी समजून म्हणजे वैराग्ययुक्त अंत:करणाने अखंड नामस्मरणाचा प्रयत्न करावा.

|८०| (२६ मे १९८९)

सुरुवातीला पू. बाबांनी **Flower Remedies** चा शोध लावणाऱ्या **Bach** ह्याच्या पुस्तकातील काही भाग वाचून दाखवला. एखाद्या झाडाजवळ तो गेला की त्या झाडाचे औषधी गुणधर्म त्याला आपोआप समजत. 'चिकित्सा प्रभाकर'चे लेखक ओगले ह्यांनाही ही सिद्धी होती. **Bach** म्हणतो की आजार प्रथम मनात होतो व मग तो शरीरात उतरतो. आजार टाळण्यासाठी सात्त्विक मन, युक्त आहार विहार इत्यादींची आवश्यकता आहे. पू. बाबा म्हणाले, श्रीमहाराज म्हणत की प्रारब्धाने जे आजार व्हावयाचे ते होतीलच; पण मनाने त्यात भर घालू नये. कारण सूक्ष्मातील आजार फार वाईट.

**साधक ग** : महात्मा गांधींनीही म्हटले आहे की विकार वाढले की आजार होतात, म्हणून विकार कमी केले पाहिजेत आणि ते कमी करण्याचा खात्रीचा उपाय म्हणजे रामनाम.

**पू. बाबा** : श्रीमहाराजांनी एकदा तुळशीचे काही उपयोग सांगितले होते. फ्लू (इन्फ्लुएंझा) झाल्यास काढा करून घ्यावयाचा, चर्मरोगावर वाटून पोटात रस घ्यायचा व चर्मरोगावरही लावायचा, मेंदूच्या विकारात वाटून डोक्यावर लेप इत्यादी. आपल्या धर्मात तुळस फार पवित्र मानली आहे कारण ती सात्त्विक वनस्पती आहे.

प्रा. ना. सी. फडके म्हणत की तुळस उपयोगी आहे म्हणून पवित्र मानली. श्रीमहाराजांना तुळस फार प्रिय होती.

ब्रह्मानंदांचे मोठे बंधू कर्मकांडी होते. श्रीमहाराजांच्या भेटीनंतर ब्रह्मानंदांनी कर्मकांड सोडले आणि नामाला वाहून घेतले. आंघोळ केली नसतानाही तंबाखू खात. त्यामुळे हा कसला साधू असे ते म्हणत. त्यांचा मुलगा भीमराव गाडगोळी. त्यांची ब्रह्मानंदांवर भक्ती होती. रोज सकाळी त्यांच्या खोलीत जाऊन त्यांच्या पायाचे तीर्थ घेत. एक दिवस सकाळी ते तीर्थ घ्यावयास गेले असता त्यांना तुळशीचा घमघमाट आला म्हणून त्यांनी ब्रह्मानंदांना विचारले. त्यावर नुकतीच महाराजांची स्वारी आली होती असे ते म्हणाले. मालाडला येणाऱ्या एका बाईंना गोंदवल्याला श्रीमहाराजांच्या शेजघरात असाच तुळशीचा घमघमाट आला. श्रीकृष्णाला तुळस प्रिय असल्यामुळे श्रीमहाराजांना त्यांच्या पायावर तुळस वाहिलेली आवडत नसे. तुम्हाला

वेर्लेकर माहीत आहेत. त्यांनी सांगितले की एकदा मानसपूजेत त्यांनी श्रीमहाराजांच्या पायावर तुळस वाहिली आणि श्रीमहाराजांनी एकाएकी पाय मागे घेतल्याचे मानसपूजेत त्यांना दिसले!

पू. बाबा पुढे सांगू लागले. एकदा श्रीमहाराजांना विचारले की सत्पुरुष आजाऱ्यांवर कृपा करतात म्हणजे काय करतात? श्रीमहाराज म्हणाले की एकतर ते आजार बरा करतात किंवा आजार राहिला तरी त्याचे दु:ख रहात नाही. ह्या संदर्भात त्यांनी एक जुनी हकिगत सांगितली. त्यांचे डॉ. फडके नावाचे एक मित्र होते. त्या फडक्यांचे चुलते पैठणला शिक्षक होते. त्यांना महारोग झाला. अंगणातच त्यांच्यासाठी पिंजऱ्यासारखी एक खोली केली होती. त्यात ते रहात असत. पैठणलाच अनंतनाथ म्हणून एक सत्पुरुष होते. ते नग्न असत. फडके यांच्या आईने त्यांचे दर्शन घ्यायची इच्छा प्रदर्शित केली म्हणून पोशाख करून ते फडके यांच्या घरी गेले तेव्हां फडके गुरुजींनाही भेटले व त्यांची चौकशी केली. फडके गुरुजी म्हणाले की मी आनंदात आहे. आजार राहणारच पण दृष्टीपुढे सतत नाथ (एकनाथ महाराज) आहेत ते तसेच राहोत. तेव्हां अनंतनाथ फडक्यांच्या आईला म्हणाले की आई, माझे कसले दर्शन घेता? तुमच्या घरातच सत्पुरुष आहे, त्याच्या दर्शनाने मी धन्य झालो!

सांगलीला पू. तात्यासाहेबांच्या पत्नी खूप आजारी होत्या. डॉक्टरांनी अवघड आहे म्हणून सांगितले होते. रात्री ११ च्या सुमारास पू. तात्यासाहेब बाहेरून घरी आल्यावर श्री. दिनकररावांनी त्यांना हे सांगितले. त्यावर ते म्हणाले, 'असं का! रामाची इच्छा असेल तसे होईल.' नंतर त्यांनी अंथरुणावर बसून एक माळ केली, (ते बोटांवर जप करीत असत) आणि शांत झोपले. थोड्या वेळात घोरूही लागले. सकाळी दुखण्याला उतार पडला होता. पुढे पू. बाबांनी त्यांना ह्याबद्दल विचारले तेव्हां ते म्हणाले की घरी येण्यापूर्वी एका गृहस्थांच्या घरी गेलो होतो. ते आजारी होते. त्यांना रामाची इच्छा असेल तसे होईल असे श्रीमहाराजांनी सांगितले होते तेच लक्षात होते. त्यामुळे लगेच झोप लागली.

नंतर पू. बाबांनी Torrents ह्या दयामाता (योगदा आश्रम) यांच्या पुस्तकातील भक्तीसंबंधी काही उतारे वाचून दाखवले आणि विचारले की आपले अडते कोठे? आपणच पुढे म्हणाले, अजून तळमळ लागत नाही कारण दृश्याची ओढ जात नाही. विरक्तीखेरीज परमार्थ नाही. पाण्यात नाहीतर

चिखलाच्या डबक्यात बसलेल्या म्हशीसारखी आपली स्थिती आहे. सत्पुरुषाच्या सहवासानेच विरक्ती येईल.

**साधक ग** : अडचणीच्या वेळेला जे काही चाललेले आहे ते श्रीमहाराजांच्या इच्छेने चाललेले आहे असे भान राहते पण नंतर ते नाहीसे होते. वास्तविक रोजच्या जीवनातील प्रत्येक क्षण श्रीमहाराजांच्या इच्छेने जातो आहे हा भाव यावयास पाहिजे तो येत नाही. अडचणीच्या वेळी कर्तृत्व श्रीमहाराजांचे व बाकीच्या वेळी माझे असे वाटत असावे.

**पू. बाबा** : विचारांच्या पातळीवर हे विश्लेषण बरोबर आहे. वास्तविक श्रीमहाराजांचे कर्तेपण आतपर्यंत पोहोचले पाहिजे.

**साधक ब** : नुकताच परगावी गेलो होतो तेथेदेखील पहाटे नामस्मरण चांगले होत होते. पण इतर वेळी तसे होत नाही.

**पू. बाबा** : ठराविक वेळाचे हे conditioning देखील गेले पाहिजे. खारच्या रामकृष्ण मठात एक कानडी संन्यासी आले आहेत. ते भेटायला आले होते. ते म्हणाले की अखंड नामस्मरण होत नाही. संसाराचे आकर्षण नाही पण देशविदेशी जाऊन व्याख्याने द्यावी, लोकांना शिकवावे असे वाटते. मी त्यांना म्हणालो की 'आपण जगतो कशासाठी याचा विचार करा.' तुम्हाला सांगतो, कनक आणि कांतेप्रमाणे लोकांनी मान द्यावा ही भावना देखील किती घातक ठरते पहा! वास्तविक संन्यास घेतला म्हणजे जीवनाचे ध्येय निश्चित ठरले; पण वासना मोठ्या सूक्ष्म असतात.

पू. बाबा पुढे सांगू लागले, Angina (हृद्रोग) झालेले एक गृहस्थ भेटायला आले होते. ते म्हणाले की आता मृत्यू समोर दिसू लागला आहे त्यामुळे सतत नामस्मरण होते. श्रीमहाराजांना प्रार्थना करतो की शेवटी नाम सुटू नये. आपण इतकी चर्चा करतो. आता प्रयत्नपूर्वक नामस्मरण वाढवले पाहिजे. निराश होण्याचे कारण नाही पण आता नामाकरतांच जगावे. नामाकरतांच मला ठेवा अशी श्रीमहाराजांची नित्य प्रार्थना करावी.

## |८१| (९ जून १९८९)

पू. बाबांनी अकबर नांवाच्या एका उर्दु कवीचा एक शेर वाचून दाखवला, तो म्हणतो, खुदावंदा म्हणजे परमेश्वरा मी पावलोपावली रस्ता चुकतो आहे. मला क्षमा कर; कारण मी काय करू? ज्या वातावरणात मी वावरतो आहे त्याचे नाव दुनिया आहे. (जिस माहौलसे गुजरता हूँ उसका नाम दुनिया है).

एकदा एका गृहस्थानी श्रीमहाराजांना विचारले, साधन कसे करावे? श्रीमहाराज म्हणाले की यासाठी दोन मार्ग आहेत. १) सर्व संसार सोडून स्वत:ला झोकून द्यावे. २) संसारात राहून शक्य तितके अनुसंधान टिकवावे. ह्या गृहस्थांनी दुसरा मार्ग पसंत केला, पण काही दिवसांनी परत श्रीमहाराजांकडे आले व म्हणाले की हा मार्ग कठीण आहे. पदोपदी नाम विसरतो तेव्हा पहिला मार्गच सांगा. श्रीमहाराज म्हणाले, असे कां म्हणतां? मी संसारातच आहे! आणि आपला मार्ग कोणता हे खरें म्हणजे भगवंतच ठरवणार. काय करावयाचे ते मुख्यत: मनाने करावयाचे आहे.

हे सांगून पू. बाबा म्हणाले, श्रीज्ञानेश्वर महाराजांनी तेराव्या अध्यायात म्हटले आहे "देह तरी वरिचिलीकडे। आपुलिया परि हिंडे। परी बैसका न मोडे। मानसाची"॥ १३-४८६ ॥ सद्गुरु हे दयामय असतात म्हणून शिष्याचे अपराध पोटात घालतात. शिष्याच्या ठिकाणीही त्यांना भगवंतच दिसतो. अमृतानुभवाच्या सुरुवातीस श्रीनिवृत्तिनाथांना निर्गुण निराकारादि विशेषणे देऊन शेवटी दयार्द्र - दयार्द्रायै निरंतरम् - म्हटले आहे.

**साधक ज** : प्रेम ही नुसती भावना नाही. ती अवस्था असली पाहिजे. जनाबाई ज्ञानेश्वर माझा सखा म्हणते. निवृत्तिनाथांबद्दल तसे काही म्हणत नाही.

**पू. बाबा** : आपल्याला खूप अज्ञान असूनही ज्ञान आहे असे कां वाटते?

**साधक ग** : आधी ज्ञान मग अज्ञान. अज्ञानाचेही आपल्याला ज्ञान आहे. परमात्मा ज्ञानस्वरूप असल्यामुळे आपल्याला ज्ञानाचा भास होतो.

**साधक प** : अज्ञानापेक्षाही आपल्याला विपरीत ज्ञान असते. हे विपरीत ज्ञानही आपल्या प्रयत्नाने जाऊ शकत नाही हे समजण्यासाठी साधन करावे लागते.

साधन चतुष्टयासंबंधी बोलणे निघाले.

**साधक प** : आपले गुरु सदैव आपल्या बरोबर आहेत आणि ते एकसारखे आपल्याकडे पाहतात हे मनात ठसले की पापकर्म घडणारच नाही. मग वेगळे साधन चतुष्टय नको.

**पू. बाबा** : १९३६ साली जहांगीर हॉलमध्ये प्रख्यात खगोलशास्त्रज्ञ सर एडिंग्टन यांच्या व्याख्यानाला मी गेलो होतो. त्यांनी केलेले विश्वाचे वर्णन ऐकून माणूस किती क्षुल्लक प्राणी आहे हे जाणवले.

**साधक ग** : तरी पण सर्व ज्ञात जीवसृष्टीत विस्तार पावणाऱ्या विश्वाची कल्पना माणूसच करू शकतो हेही महत्वाचे आहे. साधक ग यांना

साधनासंबंधी लाटू महाराजांची गोष्ट आठवली. ते म्हणत, ठाकूर (रामकृष्ण परमहंस) सुईच्या नेढ्यातून हत्ती काढून दाखवतात. मी येथे केवळ त्यांची सेवा करायला आलो तर माझ्यासारख्या अडाण्याकडून त्यांनी साधन बिधन करवून घेतले! आपण साधन करतो हे खोटे. सद्‌गुरूच साधन करवून घेतात.

**पू. बाबा** : महाराज ज्ञान व भक्ती ह्यातील फरक सांगत. ज्ञान उच्चासनावर विराजमान असते. एखादा चिखलाने लडबडलेला (विषयासक्त) माणूस त्याच्याकडे गेला तर ज्ञान त्याला आंघोळ करून स्वच्छ होऊन मग ये - साधन चतुष्टय संपन्न होऊन ये - म्हणून सांगते. ह्याच्या उलट भक्तिमाता आपल्या उच्च आसनावरून खाली उतरते व स्वतः आंघोळ घालून त्याला पवित्र करून आपल्या मांडीवर घेते. श्री. भाऊसाहेब दर तासाला श्रीमहाराजांचे दर्शन घेऊन जात. गुरुदेव रानडे निंबाळला दर तासाला गुरूंच्या तसबिरीचे दर्शन घेऊन अंगारा आपल्या कपाळाला आणि जिभेला लावीत असत. असे आपल्या गुरूंचे प्रेम हवे. लहान मुलाला आईशिवाय चैन नाही तसे हे आहे.

हे सर्व माहीत असूनही आपले साधन होत नाही कारण अजूनही आपल्याला आता केवळ ते एकच पाहिजे अशी तळमळ नाही.

शिवाप्पा म्हणून एक सत्पुरुष होते. त्यांच्याकडे त्यांचे एक शिष्य नारायणप्पा गेले. त्यांना शिवाप्पा म्हणाले की आधी संडासातून बाहेर ये - साधन चतुष्टय संपन्न हो. ह्याच्याउलट एकदा श्रीमहाराज तुकामाईबद्दल म्हणाले की त्यांच्याकडे येणाऱ्या कोणालाही त्यांनी तू काय (साधन) केलेस म्हणून विचारले नाही. मी आपणांस शरण आहे म्हणणाऱ्यास त्यांच्याजवळ जे होते ते (आत्मज्ञान) मुक्त हस्ताने दिले. श्रीमहाराजांना ह्याबद्दल कोणीतरी विचारले की हा त्यांचा स्वभावविशेष होता काय? यावर श्रीमहाराज चटकन म्हणाले, नव्हे, हा त्याचा अधिकारविशेष होता.

डॉ. पाथरकर त्यांच्या शेवटच्या आजारात तंबाखू-भुस्सा खातांना श्रीमहाराजांच्या तसबिराला दाखवून चिमटी तोंडात टाकत तेव्हां त्यांच्या डोळ्यांत पाणी येई. ते म्हणत, श्रीमहाराजांबद्दल किती प्रेम, आपलेपणा वाटतो ते कसे सांगू?

## |८२| (१६ जून १९८९)

सुरुवातीला पू. बाबांनी जे. कृष्णमूर्तींच्या **Future is Now** ह्या पुस्तकातील राधिका हॅमबर्टझर हिने लिहिलेल्या प्रस्तावनेचा काही भाग वाचून

दाखवला. अखेरच्या काही दिवसांत कृष्णमूर्तींनी त्यांच्याजवळच्या वस्तू निकटच्या मंडळींना देऊन टाकण्यास सुरुवात केली होती.

ह्या पुस्तकातच श्री. उपाध्याय नांवाच्या पाली भाषेच्या अभ्यासकांनी गौतमबुद्धाच्या शेवटाचे वर्णन दिले आहे. त्याच्या अंतकाळी भोवती जमलेल्या लोकांना बुद्धांनी दूर व्हायला सांगितले आणि आकाशाकहे पाहत शेवटचा श्वास घेतला. कृष्णमूर्तींनीही शेवटी त्यांची खुर्ची बाहेर ठेवायला सांगितले होते. आकाशाकडे पाहताना ते म्हणाले, **Let me see my beloved.**

पू. बाबा म्हणाले की विचाराने किंवा श्रद्धेने ध्येय निश्चित करता येईल. मग पुरेसे नामस्मरण झाले नाही तर दिवस फुकट गेला असे वाटू लागेल.

**साधक ज** : प्रेमाने जग जिंकता येईल काय?

**पू. बाबा** : निश्चितच. श्रीमहाराज म्हणत - माझ्यातले प्रेम काढून टाकले तर मी नाहीच. ते सर्वांना अहो जाहो म्हणत; फक्त पू. तात्यासाहेबांना ए म्हणत. ते म्हणत की त्यामुळे आपण मोठे झालो असे कधी वाटलेच नाही.

**साधक प** : प्रेमाने जग निश्चित जिंकता येईल. श्रीमहाराजांनी ते करून दाखवले आहे.

**पू. बाबा** : एकदा आनंदसागरांची आई आजारी होती. श्रीमहाराजांची प्रार्थना केल्यावर त्यांना तुळशीचे रोप दिसले म्हणून त्यांनी तुळशीचा काढा करून घेतला आणि त्यांना बरे वाटू लागले. पुढे एकदा श्रीमहाराजांची भेट झाल्यावर त्यांना तिने तापावर औषध काय म्हणून विचारले तेव्हा ते म्हणाले, पुन्हा पुन्हा कितीदा सांगायचे? तुम्हाला सांगतो, दुसऱ्याच्या मनातील कळणे यासारख्या गोष्टींना महत्व नाही. श्रद्धावान बनणे महत्वाचे आहे. यासाठी आत्मज्ञानी माणसाची संगत उपकारक ठरते. 'माळिये जेउतें नेलें। तेउतें निवांतचि गेलें।' म्हणजे काय ते पहावयास मिळते व तसे वागण्याची प्रेरणा मिळते.

आता जीवनाची संध्याकाळ झालेली आहे. प्रकृती चांगली राहिली नाही तर नामस्मरण चांगले होत नाही म्हणून आता लगबग केली पाहिजे. खरे म्हणजे सत्संगाशिवाय तरणोपाय नाही पण सर्वकाळ सत्संग शक्य नाही. म्हणून सद्विचार, सद्ग्रंथवाचन व अखंड नामस्मरण करावे. ह्यातील तिसरे शक्य आहे हे मी स्वानुभवाने सांगतो.

## |८३| (२३ जून १९८९)

चर्चा, दृश्य खरें वाटते तसे नाम खरें वाटत नाही ह्या नेहमीच्याच विषयावर सुरू झाली.

**साधक प** : 'मी' फक्त माझ्या नखाग्रापर्यंत (finger tips) पसरलेला आहे.

**पू. बाबा** : पाश्चात्य तत्त्वज्ञान्यांच्या म्हणण्याप्रमाणे 'मी' सर्व विश्वात लीन झाले पाहिजे, कारण त्या विश्वातच मी आहे. पाण्यात पाणी मिसळल्याप्रमाणे विश्वमनात माझे मन लीन झाले पाहिजे. शंकराचार्य तर ह्याचाही पुढे जातात. ते म्हणतात सत् हे जड नाही. ते चेतन ज्ञानमय आहे, पूर्ण आहे आणि म्हणून आनंदमय आहे. अशा सच्चिदानंदात विलीन होणे म्हणजे अध्यात्म. कांट म्हणतो की जडापलीकडे सूक्ष्मात जाण्यातच माणसाची खरी करामत आहे. पदार्थविज्ञान सांगते की प्रकाश हा ध्वनीपेक्षा सूक्ष्म आहे. पण भारतीय तत्त्वज्ञानाप्रमाणे शब्द हा तेजापेक्षा सूक्ष्म आहे. शब्द हा आकाशाचा गुण आहे. मननात् त्रायते इति मंत्रः। त्या मंत्रजपाने नादब्रह्मापर्यंत जाऊन नंतर शब्दब्रह्मात म्हणजे अनाहत नादात, ॐकारात प्रवेश करावयाचा. ह्यासाठी अखंड नामस्मरण केले पाहिजे.

पू. बाबांनी नंतर काही जुन्या गोष्टी सांगितल्या.

रामकृष्ण आश्रमातील एक संन्यासी श्रीमहाराजांना भेटावयास आले होते. त्यांना श्रीमहाराजांनी विचारले की आपण (पूर्वाश्रमीचे) कोण? तेव्हां ते म्हणाले की संन्याशाने ते सांगावयाचे नसते. नंतर चर्चेच्या ओघात त्यांनी श्रीमहाराजांना आपण कोण म्हणून विचारले. (श्रीमहाराज देह ठेवल्यानंतर पू. तात्यासाहेबांच्या मुखातून बोलत असत) तेव्हां श्रीमहाराज म्हणाले की (पूर्वाश्रमी) आपण कोण होतो हे तुम्हाला आठवते पण तुम्ही सांगत नाही. मी तर त्या पलीकडे (देहाने) गेलो आहे. कोण होतो याचे स्मरणही नाही. संन्यासी पू. बाबांना म्हणाले, तुम्ही भाग्यवान आहात. यांचा सहवास सोडू नका.

नंतर सत्पुरुषांच्या स्वभाववैचित्र्याच्या संदर्भात पू. बाबा म्हणाले की आपण खरोखरच भाग्यवान आहोत. श्रीमहाराज गुरूच्या शोधात होते त्या भ्रमण काळात त्यांची रामकृष्णांशी (बंगालमधील नव्हेत) भेट झाली होती, त्यासंबंधी पू. बाबांना सांगताना श्रीमहाराज म्हणाले होते की तुमच्या तिकडेच

कोठेतरी (हैद्राबादकडे) भेटले होते. ते आत्ता येथे दिसत तर पाहता पाहता नाहीसे होत! हे समर्थ संप्रदायातील थोर सत्पुरुष होते. श्रीमहाराजांसमोर ते प्रकट झाले तेव्हा श्रीमहाराजांनी त्यांना साष्टांग नमस्कार घातला. त्यांनी श्रीमहाराजांना सांगितले की बाळ! येहेळेगांवच्या तुकाराम चैतन्यांकडे जा. तेथें तुझे पूर्ण समाधान होईल. पू. बाबा पुढे सांगू लागले, ज्ञानेश्वर महाराजांनी मन मृदू, संवेदनशील करून ईश्वराला जाणण्याचे आवाहन केले आहे. रामदास म्हणतात 'आधी पहावा देहधारी। मग पहावा जगदांतरी।' तुलसीदासही मला सदैव रामाचे प्रेम वाटो म्हणतात. आपणही आता नामाचा ध्यास घेतला पाहिजे.

श्री. काकासाहेब तुळपुळे मला एकदा म्हणाले की सर्वजण सत्संगाच्या महत्वाचे इतके वर्णन करतात पण तुकारामांना कोठे सत्संग मिळाला होता? रात्री हा प्रश्न मी श्रीमहाराजांना विचारला तेव्हा ते म्हणाले, कां नाही? सत्संग हा देहाचाच असावयास पाहिजे असे नाही. सद्विचार किंवा नामाची संगत तितकीच श्रेष्ठ आहे आणि ती तुकाराम महाराजांना मिळाली होती.

हे सांगून पू. बाबा म्हणाले, आता आयुष्याची संध्याकाळ झालेली आहे. आता नामाकरता जगतो अशी तळमळ लागली पाहिजे.

## |८४| (२० जून १९८९)

आमच्यापैकी एका साधकांना गेले ५-६ दिवस सायनसचा त्रास होतो आहे त्यासंबंधी बोलणे सुरू झाले.

**पू. बाबा** : आपण देहाला औषधपाणी करतो, तथापि बरे होणे प्रारब्धाधीन आहे हे जाणून मनाला शांतता का वाटत नाही; ते अस्वस्थ का होते? वास्तविक आजच्या जगात आपले कर्तृत्व किती लटके आहे याचा पदोपदी प्रत्यय येतो. पण तरीही प्रारब्धाचा सिद्धांत आपल्याला पूर्णपणे पटत नाही.

**साधक ग**: यश मिळते तेथे माझे कर्तृत्व व अपयशी होतो तेथे माझे प्रारब्ध अशी आज आमची स्थिती आहे. सद्गुरु योग्य तेच करतात असे वाटत नाही.

**साधक प** : देहाची निरोगी स्थिती स्वाभाविक आहे. ती तशी राहिली नाही की मी अस्वस्थ होतो.

**साधक ख** : वास्तविक तुकाराम महाराजांप्रमाणे काहीही घडले तरी 'बरवें केलें। विठोबा बरवें केलें।' असे वाटले पाहिजे. पण आमची तेवढी श्रद्धा नाही.

**पू. बाबा** : आपल्यापैकीच एकांना अँजायनाचा अलिकडे बराच त्रास होत होता तेव्हांदेखील सर्व भार श्रीमहाराजांवर टाकून ते रोज कामाला जात होते असे त्यांच्या मुलानेच सांगितले. सद्गुरूंवरील थोड्याशा विश्वासाने देखील जर हे शक्य होते तर आपण अस्वस्थ का होतो? श्रीमहाराज एकदा म्हणाले की याचे कारण देह म्हणजेच 'मी', तो चांगला असावासे वाटते. ही देहबुद्धी गेल्याखेरीज प्रारब्धावर देह टाकता येणार नाही. रिटायर झाल्यावर श्री. भाऊसाहेब (केतकर) गोंदवल्यास राहायला गेले. काही दिवसांनी त्यांना हर्नियाचा त्रास होऊ लागला. हा आपल्याआड येणार नाही; ऑपरेशनची आवश्यकता नाही असे श्रीमहाराजांनी त्यांना सांगितले. ते त्यांनी इतके घट्ट धरले की पुढे मालाडला त्यांना पुन्हा त्रास होऊ लागला तेव्हा त्यांनी तसबिरीसमोर उभे राहून स्वारींच्या (महाराजांच्या) कानावर घाला म्हणून मला सांगितले. पुढे ते त्यातून बरे झाले ही सगळी हकिगत मी पूर्वी सांगितली आहेच.

पू. तात्यासाहेबांचे प्रोस्टेटचे ऑपरेशन व्हावयाचे होते. त्यापूर्वी येथे येणाऱ्या एका साधकांच्या वडीलांचे ऑपरेशन झाले होते म्हणून ते पू. तात्यासाहेबांना म्हणाले की तसे चिंता करायचे कारण नाही; सोपे असते. शंभरात एखादी केस दगावते. त्यावर पू. तात्यासाहेब म्हणाले, तो एक मीच असलो तर! आणि तसेच झाले.

एका साधकांच्या मुलीचे लग्न जमत नव्हते त्यामुळे ते चिंताग्रस्त असत. श्रीमहाराज म्हणाले आपण चिंता करू नये, लग्न होईल. पुढे काही दिवसांनी ते वारले. त्यानंतर १० वर्षांनी तिचे लग्न झाले आणि चांगला संसार झाला. अशी कितीतरी उदाहरणे माहीत असूनही आपला श्रीमहाराजांवर आणि त्यांच्या वचनांवर विश्वास बसत नाही, काय करावे!

श्रीमहाराज म्हणत की पैसा हे सुखाचे साधन होऊ शकत नाही. उलट त्याने लोभ मात्र वाढतो. दारिद्र्य आणि देहदु:ख यांमध्ये नाम टिकणे अत्यंत कठीण आहे. देहदु:ख केव्हां आणि काय होईल कोणी सांगावे! म्हणून आजच्या शरीर प्रकृतीच्या भ्रमामध्ये राहू नका. आजच तळमळीने नाम घेऊ लागा, कारण आज तेवढेच आपल्या हातात आहे. लक्षात ठेवा की स्थूल आणि सूक्ष्म यांना जोडणारे नामच आहे.

सद्गुरूविषयी पूज्य भाव, श्रद्धा, प्रेम पाहिजे. देहाची स्थिती काहीकां होईना, माझ्या वाट्यास हे कां असे कधीही म्हणू नये. आपल्या गुरूंना बोल

लावू नये. "का आपुला ठावो न सांडिता। आलिंगिजे चंद्रु प्रकटता। हा अनुरागू भोगिता। कुमुदिनी जाणे॥" सद्गुरु हे चंद्र होत आपण चंद्रविकासी कमल-कुमुदिनी झाले पाहिजे.

पू. बाबा पुढे म्हणाले, विवेकातून वैराग्य आले तरच त्या विवेकाचे महत्व. असे वैराग्य आले की नामात गोडी वाटू लागेल. विवेकाचे इंजिन चालण्यासाठी त्याला भावनेची, तळमळीची वाफ पाहिजे असे श्रीमहाराज म्हणत. तळमळ हे परमार्थाचे मर्म आहे कारण त्यातून शरणागती येते. पण हे सर्व गुरुकृपेने होते. तुम्ही म्हणाल, असे जर आहे तर आपल्या प्रयत्नांना काही अर्थ आहे की नाही? प्रयत्नांना निश्चित महत्व आहे कारण प्रयत्न केल्यानंतरच प्रयत्नाने काही होत नाही हे समजून येईल. आधी प्रयत्न, त्यातून शरणागती व मग गुरुकृपा. प्रयत्नांती परमेश्वर खरेच आहे. आज प्रयत्न करणे येवढेच आपल्या हातात आहे. खरोखर सगुणाचे महत्व पटणे व त्याविषयी प्रेम वाटणे कठीण आहे. वामनपंडितांना सगुणाचे महत्व पटवून देताना समर्थांनी शेवटी हनुमानाचे रूप धारण केले तेव्हा कोठे त्यांचा सगुणावर विश्वास बसला!

बरी एक जुनी आठवण झाली ती सांगतो. आमचे लग्न झाल्यावर लगेचच आम्ही गोंदवल्यास गेलो होतो. आम्ही दोघे बाहेरून आल्यावर, रामाला जाऊन आलात का असे श्रीमहाराजांनी विचारले. मी नाही म्हणालो. तेव्हां महाराज म्हणाले, "रामाला जाऊन यावे आणि त्याला म्हणावे की माझी मागण्याची इच्छा नाहीशी कर."

## ।८५। (७ जुलै १९८९)

सुरुवातीला पू. बाबांनी स्वामी रामदासांच्या Ramdas speaks ह्या पुस्तकातील भाग वाचून दाखवला.

साधक ज यांच्या पत्नीचे बुधवारी ऑपरेशन झाले. त्या संदर्भात ते ज ना म्हणाले, अडचणीत गुरूंची आठवण राहाणे खरें. विशेषत: शरीराच्या वाईट स्थितीत आठवण राहणे अवघड जाते. वेदान्त सांगतो की देहाचे सर्व भोग प्रारब्धानुसार घडतात. पण हा वेदान्त पचवणे अवघड आहे. म्हणून राम कर्ता ही भावना वाढवणे भक्ताच्या दृष्टीने योग्य होय. जीवनातील सर्व घडामोडीत त्याचा हात आहे; सर्व काही त्याच्या इच्छेने घडते असे म्हणावे. मला दु:ख होते, पण माझ्या हिताचे काय ते तो जाणतो अशी खात्री पाहिजे. ही खात्री झाली की आपल्या जीवाची उलघाल होणे थांबते.

चर्चा चालू असतांना श्रीमहाराजांचे एक भक्त त्यांच्या पत्नी व मुलगा भेटायला आले. मुलगा अमेरिकेत असतो. तो म्हणाला की काम करणाऱ्यास अमेरिकेत वाव आहे. मत्सर नाही पण आपलेपणाही नाही. त्याला पू. बाबा म्हणाले, रोज जप करीत जा, श्रीमहाराजांची आठवण ठेव. दारूच्या गुत्त्यात गेल्यावर दारूच मिळायची, तसे माझ्याकडे आल्यावर नामाशिवाय काय मिळणार? खरोखर, माझ्यातले श्रीमहाराज काढले तर मी नाहीच. मग मी अगदी फुसका आहे. पैसा, लौकिक, आप्तेष्ट इत्यादी गोष्टी समाधान देत नाहीत. पूर्ण समाधान संतांजवळच मिळते. खरें प्रेम संतच करतात. ह्या देहाकडून कधी पाप घडले नाही असे रामकृष्ण स्वत:विषयी म्हणाले. आपली काही तशी स्थिती नाही. म्हणून पदोपदी सांभाळले पाहिजे. अमेरिकेत मोह पडावा अशी स्थिती आहे, तेव्हां तेथें सांभाळ. दारूपासून दूर रहा. भगवंताला जो देह द्यावयाचा तो पवित्र पाहिजे.

आलेली मंडळी गेल्यावर चर्चा पुढे चालू झाली. पू. बाबा म्हणाले, संतच खरें प्रेम करतात. अकारण प्रेमाचा वर्षाव करून ते आपल्याला बुडवून टाकतात. एकदा मी श्रीमहाराजांना म्हणालो, "आपले माझ्यावर फार उपकार झाले!" हे ऐकून श्रीमहाराजांना भरून आले पण लगेच स्वत:ला सावरून म्हणाले, "कोणावर काय उपकार झाले कोणास माहीत! ढग पाऊस पाडून जातो तो त्याचा काय परिणाम झाला ते पहायला कधी परत येतो का?

गोंदवल्यास नवी खोली बांधली होती. तिच्या चौकटीच्या कोयंड्यात बोट अडकवून श्रीमहाराज उभे होते. एकाएकी श्री. भाऊसाहेबांना म्हणाले, "ह्या एक्कावन वर्षांत विचाराशिवाय एक पाऊल टाकलेले नाही. लहानपणी घरातून गेलो तो घरी नाम होत नव्हते म्हणून नव्हे, तर विधिघटनाच तशी होती."

पू. बाबा पुढे सांगू लागले, एकदा मी श्रीमहाराजांना विचारले, 'आपल्या परंपरेतील सर्वांना आत्मज्ञान झाले होते का? ब्रह्मानंद महाराज आणि आनंदसागरांची काय स्थिती होती? श्रीमहाराज म्हणाले, "होय, सर्वजण पोहोचलेले होते. बुवा म्हणतच की त्यांनी (श्रीमहाराजांनी) मला आपल्यासारखे केले. आनंदसागर साधन केल्यावर पोहोचले." आनंदसागरांची बालवृत्ती होती. श्रीमहाराज त्यांच्याशी जास्त मोकळे होते. ब्रह्मानंदबुवा श्रीमहाराजांसमोर कधी बसत नसत. श्रीमहाराजांना त्यांचे हे वागणे आवडत नसे. आनंदसागरांच्या मृत्यूनंतर श्रीमहाराज म्हणाले, "आज माझा उजवा हात गेला!"

**पू. बाबा (साधक ग ना उद्देशून)** : आपल्याला सद्गुरूंचे प्रेम का येत नाही ?

**साधक ग** : आम्ही श्रीमहाराजांना कधी पाहिले नाही. ते गेले, आता ते नाहीत अशीच आमची भावना आहे त्यामुळे कदाचित प्रेम वाटत नसेल.

**पू. बाबा** : हे तितकेसे खरें नाही कारण तसे असते तर ते देहात असतांना त्यांच्याजवळ जी माणसे होती त्या सर्वांना कोठे त्यांच्याबद्दल प्रेम वाटले ? त्यांच्याबद्दल प्रेम वाटणे म्हणजे अखंड नामस्मरण होणे.

**साधक प** : आम्ही एखाद्या संकल्पनेवर (concept) प्रेम करतो पण गुरु ही संकल्पना मनात पक्की होत नाही व जी अंधुक कल्पना आहे ती सर्वोच्च मूल्य (Supreme Value) होत नाही.

**साधक ज** : गुरु असीम आहे त्यामुळे तो नेमका माझा - फक्त माझा असे वाटत नाही. प्रेम वाटण्यासाठी आम्हाला प्रेमवस्तूची मालकी (possession) पाहिजे असते.

**पू. बाबा** : महाराज माझे आहेत असे म्हणण्यापेक्षा मी महाराजांचा आहे असा भाव ठेवावा. आज तरी आपण शक्य तितके जास्त नाम घेण्याचा प्रयत्न केला पाहिजे. नाम म्हणजेच श्रीमहाराज ही पक्की खूणगाठ बांधली पाहिजे. श्रीमहाराजांचे प्रेम आणि नामाचे प्रेम ही भिन्न नाहीत.

## |८६| (१४ जुलै १९८९)

आज आषाढी एकादशी. दर एकादशीस संध्याकाळी खाली मठात काही बायका भजन करतात. आजही होते. मंगळवारी गुरुपौर्णिमा आहे. त्यानिमित्ताने ह्या आठवड्यात बाहेरचीही बरीच भजनी मंडळे येतात. ह्या संदर्भात पू. बाबा म्हणाले, 'कसले भजन करतात कोणास ठाऊक!' उपनिषदात प्रश्न केला आहे 'किं नाम भजनम्।' आणि त्याचे उत्तर दिले आहे 'भजनम् नाम रसम्।' भगवंताच्या नामाचे चिंतन करणे म्हणजे भजन. हल्ली भजन म्हणजे गाणे झाले आहे. श्रीमहाराज म्हणत, भजन साधे म्हणावे म्हणजे ते सर्वांना म्हणता येते. तसेच भक्तीचे, करुणेचे अभंग म्हणावे, उगीच 'फुटो हें मस्तक। तुटों हें शरीर।' असले म्हणू नयेत.

खरोखर भक्ती ही और चीज आहे. अद्वैत मान्य करूनही ज्ञानेश्वर महाराज पुन्हा विचारतात 'देव देऊळ परिवारु। कीजे कोरूनी डोंगरु। तैसा भक्तीचा

व्यवहारू। कां न व्हावा॥' अमृतानुभव ९.४१॥ भक्त व देव एकच हे एकवेळ समजेल पण भक्तीही एकरूप कशी?

**साधक प** : १) झेन तत्त्वज्ञानात तिरंदाजाला (archer) इतका अभ्यास करायला सांगतात की तो, त्याचे लक्ष्य आणि धनुष्यबाण हे सगळे शेवटी एकरूप होते. भक्तीदेखील अशी तादात्म्याने होत असावी. २) आईच्या पोटातून मूल येते. ते तिचाच भाग असते. तसाच देवापासून भक्त होतो. आई मुलावर प्रेम करीत असतेच. मुलाचे अज्ञान नाहीसे होऊन त्याला आईचे प्रेम वाटू लागते तसे भक्ताला देवाचे प्रेम वाटू लागले की भक्ती जन्मते. भक्तीसाठी अहंकार सोडला पाहिजे म्हणतात पण हा विरोधाभास वाटतो.

**साधक ग** : असे अनेक विरोधाभास आहेत. उदाहरणार्थ, साधन सहज व्हावे म्हणून प्रयत्न करावे लागतात.

**साधक क** : निसर्गदत्त महाराज म्हणत की सुरुवातीला मी अमूक केले पाहिजे, तमूक करतो असे म्हणत असे. पण पुढे दिसून आले की मी काहीच करीत नाही; सर्व काही परमात्म्याच्या इच्छेने होते आणि ते चांगलेच होते. मग प्रयत्न करण्याचे सोडून दिले. वास्तविक, जग हे आपल्या कल्पनेतून निर्माण होते. कल्पना करायचे थांबले की जग संपले. एखादा सिनेमा आवडला नाही तर आपण उठून नाही का जात; तसे!

**पू. बाबा** : आपल्याला पैसा खरा वाटतो तसे नाम खरें का वाटत नाही?

**साधक प** : पैसा स्थूल आहे. आज व्यवहारात त्याला किंमत आहे. तसे नामाला व्यावहारिक मूल्य (pragmatic value) नाही. ते जाणवले तर नामाचे प्रेम येईल.

**साधक ग** : पैशात जशी सुरक्षितता (security) वाटते तशी नामात वाटत नाही आणि नाम आणि श्रीमहाराज एकच कसे हे तर अजिबात समजत नाही.

**पू. बाबा** : स्थूलामागचे सूक्ष्म पाहण्याची आपण सवय लावून घेतली पाहिजे. आजारात औषधाने गुण येतो पण आजार बरा करण्याचे गुण त्या औषधात भगवंतानेच घातले हे लक्षात येत नाही.

**साधक ख** : तथापि पुष्कळ वेळा पेशंटला औषधापेक्षाही डॉक्टरचाच जास्त भरंवसा वाटतो.

**पू. बाबा** : तरी देखील माझ्या जीवनात जे जे घडते ते भगवंताच्या इच्छेनेच घडते असे खरें खरें वाटले पाहिजे. 'तुका म्हणे ठेवी तैसे। आम्ही

राहो त्याच्या इच्छे॥' असे वाटल्यावर दु:खाला जागाच राहणार नाही. ह्या बाबतीत भाऊसाहेबांचा (केतकर) आदर्श ठेवला पाहिजे. एकदा श्रीमहाराजांना म्हणालो की मला सुखाची नोकरी मिळावी. श्रीमहाराज म्हणाले, मागायचे तर मालकी मागावी, स्वातंत्र्य मागावे. खरोखर नामाची 'लगन' लागली पाहिजे.

**साधक क** : निसर्गदत्त महाराज म्हणत की तुम्ही घाण करता आणि मला ती काढायला सांगता! वास्तविक तुमची घाण तुम्हीच काढली पाहिजे. आणखी एकदा म्हणाले, तुम्ही तुमच्या भोवती भिंती उभ्या केल्या आहेत आणि त्या तुम्हालाच पाडाव्या लागतील.

**साधक ब** : या पाडापाडीचीच आम्हाला भीती वाटते कारण ह्या भिंतींचेच प्रेम वाटते.

आजच्या सकाळच्या निरूपणातील ''प्रेमसूत्र दोरी। नेतो तिकडे जातो हरी॥'' ह्या अभंगाचा पुन्हा उल्लेख करून पू. बाबा म्हणाले, प्रेमसूत्र शब्दावर सोनोपंत दांडेकर फार छान सांगत. ते म्हणत अगदी साध्या दोऱ्यानेदेखील अतिशय नाजूकपणे हरी बांधला जातो.

**साधक ग** : ह्याच्या उलट नामदेवांच्या गौळणी त्याला दाव्याने बांधू पहातात.

**पू. बाबा** : रसखान म्हणून भक्त कवी होता. तो म्हणतो की वाटीभर ताकासाठी गोपी बाळकृष्णाला नाच करायला लावत असत. त्या ओळी अशा :

जोगी जती तापसी अरु सिद्ध निरंतर जाहि समाधि लगावैं।
ताहि अहीरकि छोहरियाँ छछियाभरि छाछपै नाच नचावैं॥

ज्याचे दर्शन व्हावे म्हणून योगी, यती, तापसी आणि सिद्ध निरंतर समाधी लावतात त्याला गवळ्यांच्या मुली वाटीभर ताकासाठी नाचून दाखवायला लावत. हा प्रेमाचा महिमा!

## |८७| (२१ जुलै १९८९)

**पू. बाबा** : आपल्यापैकी कितीतरी माणसे प्रापंचिक संकटे आली की त्यातून बाहेर पडता यावे म्हणून श्रीमहाराजांची प्रार्थना करतात, संकट टळते तेव्हां ते श्रीमहाराजांच्या कृपेनेच झाले असे त्यांना प्रामाणिकपणे वाटत असते. आणि असे असूनही श्रद्धा बळकट का होत नाही? मला वाटते, समोर सांगणाऱ्या माणसाचे सांगणे जितके खरें वाटते तितके पुस्तकातले किंवा

श्रीमहाराजांचे सांगणे खरें वाटत नाही. संपत्तीची संकल्पना माहीत नसली तरी पैसा खरा वाटतो तर नामाची संकल्पनाही नाही आणि नामही खरें वाटत नाही.

**साधक ग** : नामावर किंवा श्रीमहाराजांवर श्रद्धा नाही असे नाही तथापि त्या श्रद्धेचे निष्ठेत रूपांतर होत नाही.

**साधक ज** : नाम, नामी आणि नाम घेणारा तिघेही जेव्हां एकरूप होतील तेव्हां निष्ठा निर्माण होत असावी.

**पू. बाबा** : तुम्ही म्हणता ती शेवटची स्थिती झाली; सुरुवातीची नव्हे. वास्तविक नाम हे चिन्ह Symbol आहे. नाना म्हटले की नाना ही व्यक्ती मनात येते तसे नाम घेतले की भगवंत किंवा श्रीमहाराज मनात येत नाहीत.

**साधक ब** : तसे झाले की काही अडचणच राहणार नाही. नाम आणि श्रीमहाराज एकच हे पटले की सगळे कोडे सुटेल. वास्तविक नाम पवित्र वाटले पाहिजे.

**पू. बाबा** : चिन्हांमधेही (Symbols) फरक आहे. उदाहरणार्थ, ध्वज हे चिन्ह आणि ध्वजाची संकल्पना आणि देवाचे नाम आणि त्याची संकल्पना यात फरक आहे. नाम हे चिन्हही आहे आणि अंतिम सत्यही आहे हीच खरी समाजायला कठीण गोष्ट आहे.

**साधक ब** : नाम पवित्र वाटले पाहिजे. नाम घेतले की मनातील विकार नाहीसे झाले पाहिजेत.

**साधक प** : एखादी दृश्य वस्तू जशी उचलून बाजूला टाकता येते तसे मनातले विचार, विकार काढून टाकता येत असले पाहिजे. मन निर्विचार करणे, रिकामे करणे शक्य आहे असे कृष्णमूर्ती म्हणत. असे जर आहे तर अशांती का येते? माणसाचे कर्म हे त्याचे कारण नाही का असे श्रीमती पुपुल जयकर यांनी कृष्णमूर्तींना विचारले तेव्हां ते फक्त हसले. दुसरे असे की नाम घेणार नाही तर दुसरे काय करणार असा स्वत:ला प्रश्न केला तर समाधानकारक उत्तर मिळत नाही. आणि ह्यावरूनच आपल्या जीवनातील नामाचे स्थान व महत्व लक्षात येते.

**पू. बाबा** : ह्याचा अर्थ असा की नाम आत खोल गेलेले आहे पण त्याचा पूर्ण निष्ठा निर्माण होण्याइतका अभ्यास झालेला नाही.

**साधक ज** : तीनही अवस्थात नाम चालले पाहिजे.

**पू. बाबा** : तीनही अवस्थांचे जाऊ द्या! केवळ जागेपणीदेखील सतत नाम चालू ठेवणे अवघड आहे हे मी अनुभवाने सांगतो. वास्तविक नाम आणि भगवंत इतकेच नव्हे तर सर्व जग नाममय झाले पाहिजे. तुकाराम महाराजांनी

'कासयाने पूजा करूं केशीराजा।' ह्या अभंगात म्हटल्यासारखी स्थिती झाली पाहिजे. (पू. बाबांनी पूर्ण अभंग वाचून दाखवला) यासाठी देहबुद्धी गेली पाहिजे. **Nam should be impregnated.** रंध्रारंध्रात नाम भरले पाहिजे. नाम घेतांना आंच पाहिजे. नाम हाच ध्यास आणि हव्यास झाला पाहिजे. नाम स्थल, काल निमित्ताच्या पलीकडे चालले पाहिजे.

**|८८|** (२८ जुलै १९८९)

नुकतीच दि. २३, २४, २५ ला अतिवृष्टी झाली. नांदेड, बीड, रायगड, मुंबई, पुणे, कोल्हापूर, सांगली जिल्ह्यात सुमारे ६०० माणसे मेली. मालमत्तेचीही अपरिमित हानी झाली. ह्या घटनेचा उल्लेख करून पू. बाबा म्हणाले, पहा केवढा मोठा संहार झाला! जगात सगळीकडेच विनाश चालू आहे. इराण, इराक युद्धात संहार चालला आहे. दुसऱ्या महायुद्धात सुमारे ६० लाख ज्यूंची कत्तल झाली.

**साधक ग** : १९४३ च्या बंगालमधील दुष्काळात ३० लाखाहून जास्त भूकबळी झाले.

**पू. बाबा** : हे सर्व खरें आहे. पण ह्या घटना घडत असतांना त्यांचा आपल्या साधनावर विपरीत परिणाम होता कामा नये.

**साधक ड** : श्रीमहाराजांनीच सांगितले आहे की प्रापंचिक माणूस ज्वालामुखीच्या तोंडावर बसलेला आहे. केव्हां काय घडेल ते सांगता येत नाही. अशा परिस्थितीत नाम टिकविले पाहिजे.

**साधक ग** : हा समतोल टिकविणे फार अवघड आहे. आपल्या अवतीभोवती घडणाऱ्या घटनांच्या बाबतीत संवेदनाशून्य (insensitive) व्हावयाचे नाही आणि त्यांचा साधनावर प्रतिकूल परिणाम होऊ द्यायचा नाही हे अवघड आहे.

**पू. बाबा** : संवेदनाशून्य होऊ नये. आपल्याला त्यांचे दुःख कमी करण्यासाठी शक्य असेल ते सर्व करावे - निदान शुभेच्छा तरी ठेवावी. पण त्यावर निष्फळ विचार करीत राहून साधन बुडवू नये. १८७६-७७ च्या दुष्काळात श्रीमहाराजांनी दुष्काळी काम काढले व लोकांना भाकरी आमटी दिली. रोज सुमारे दीड हजार माणसे जेवत होती. औंधचा राजा हे काम कोण करते आहे म्हणून पहायला आला. तेव्हां हे करणे शक्य आहे.

**साधक ग** : श्रीमहाराजांची दया केवळ माणसांपुरतीच मर्यादित नव्हती. दुष्काळात कितीतरी गायी त्यांनी खाटकांकडून सोडविल्या.

**पू. बाबा** : एक जुनी गोष्ट आठवली ती सांगतो. एक गृहस्थ श्रीमहाराजांकडे आले होते. ते नाथभक्त होते. त्यांना नाथांकडून अनुग्रह पाहिजे होता. श्रीमहाराजांनी विचारले की मग अडचण काय आहे. ते म्हणाले की आज नाथ (एकनाथ महाराज) हयात नाहीत. तेव्हां श्रीमहाराज म्हणाले, म्हणजे तुमच्या म्हणण्याचा अर्थ नाथ जिवंत नाहीत आणि तुम्ही जिवंत आहात. खरोखर, पारमार्थिक दृष्टीने ह्याच्या उलट स्थिती आहे.

**साधक क** : निसर्गदत्त महाराजांकडे एक गृहस्थ आले होते. ते त्यांना म्हणाले की खरोखर ज्ञानेश्वरांना किती दु:ख आणि अपमान सहन करावे लागले. निसर्गदत्त महाराजांनी त्यांना विचारले की हे तुम्हाला कोणी सांगितले? आपण ज्ञानेश्वरांना विचारले काय? की त्यांना दु:ख झाले ही तुमचीच कल्पना आहे? कारण आपले जग आपल्या कल्पनेतून येते. ते गृहस्थ म्हणाले, आपण सांगता ते पटत नाही पण मोठे वेधक बोलता, तेव्हां बोलत रहा. यावर निसर्गदत्त महाराज म्हणाले की ही पण तुमची कल्पनाच आहे. ह्या कल्पनेपलीकडे जा.

**साधक ग** : हे अवघड आहे कारण जगाची सुरुवातच कल्पनेतून भगवंताच्या संकल्पातून झाली आहे.

**पू. बाबा** : कल्पना ही वृत्ती आहे. वृत्तींचा अखंड प्रवाह चालू असतो आणि त्या एकसारख्या बदलत असतात. एकच एक वृत्ती ठेवणे आणि ती भगवदाकार करणे म्हणजेच अनुसंधान होय. हा अभ्यास आहे. जे काही घडते ते राम इच्छेने घडते म्हणावे म्हणजे वृत्ती त्रास देत नाहीत. श्रीमहाराज म्हणत की तुकाराम महाराजांना फार दु:ख सोसावे लागले असे लोक म्हणतात. ते स्वत: तर सुखदु:खापलीकडे पोहोचले होते.

**साधक क** : नाम खरें म्हणतात पण खरें कशाला म्हणावयाचे? माझ्या मते ही समोर दिसते आहे ती ताटली खरी कारण ती इंद्रियप्रत्यक्ष आहे.

**साधक ड** : ही ताटली गोल दिसते. पण इंद्रियांवर विश्वास ठेवावयाचा म्हटले तर ती फसवत नाहीत काय? पूर्ण चंद्र देखील ताटलीसारखाच दिसतो. पाण्यात बुडलेला सरळ काठीचा भाग वाकडा दिसतो.

**साधक प** : खरेपणा हा देश काल निमित्तांनी मर्यादित आहे तर नाम ह्या

तीनही मर्यादांपलीकडे आहे. त्यामुळे दृश्यातील खरेंपणा नामाला लावता येणार नाही.

**पू. बाबा** : इंद्रियांच्या खरेंपणामध्ये देखील स्पर्शाला जास्त महत्व आहे.

**साधक प** : निमित्त, काल आणि देश ह्या मर्यादा ह्या क्रमानेच जातात. स्पर्श हा देशाने किंवा स्थलाने मर्यादित आहे म्हणून तो सर्वात श्रेष्ठ आहे. तो सर्वात शेवटी जातो. तथापि हा स्पर्श कोठे होतो? उदाहरणार्थ, माझ्या अस्तित्वाचा स्पर्श कोठे होतो?

**साधक ख** : 'मी आहे' हा भाव आहे, स्पर्श नाही.

**साधक ग** : 'मी आहे' ही केवळ जाणीव आहे.

**साधक प** : पण ह्या जाणिवेचे स्थान - location काय आहे? उदाहरणार्थ, विचारांचे location मेंदू आहे.

**साधक ख** : मेंदू फक्त एक computer आहे. तेथें 'मी' ची जाणीव नाही. ती हृदयात असली पाहिजे. रमणमहर्षीही असेच सांगत.

**पू. बाबा** : आपल्या खरेंपणाची कल्पना मुख्यत: स्पर्शावर अवलंबून आहे. बाह्य स्पर्शापेक्षा विचारांचे स्पर्श सूक्ष्म असतात. नामाचा स्पर्श तर भगवंताचा संस्पर्श असल्यामुळे तो साधणे जास्त कठीण आहे. स्मृती हा विचारांच्या स्पर्शाचा ठसा असतो. ती स्मृतीदेखील भगवंताने भरून गेली पाहिजे. त्यासाठी अखंड भगवंताचा विचार पाहिजे. तो नामस्मरणाने साधतो म्हणून संतांनी नामस्मरणावर इतका भर दिला आहे.

## |८९| (४ ऑगस्ट १९८९)

**पू. बाबा** : गेल्या रविवारी निरूपणानंतर एक बाई येऊन भेटल्या. त्या म्हणाल्या की तुमच्याविषयी बरेच ऐकले होते म्हणून निरूपणाला आले. मी विचारले, मग काय वाटले? त्या म्हणाल्या प्रथम वाटले की हे पाप्याचे पितर काय बोलणार? पण निरूपण सुरू झाल्यावर लक्षात आले की हे वेगळे काम आहे. निरूपणात तुम्ही पूर्ण शांती संबंधी सांगितले त्याचा अर्थ कळला नाही. मी म्हणालो, शांती म्हणजे काय हे आपल्याला खरोखरच माहीत नाही. तात्पुरत्या समाधानाला आपण शांती समजतो.

पू. बाबांनी कृष्णमूर्तींच्या **Freedom from the known** ह्या पुस्तकातील काही भाग वाचून दाखविला. कृष्णमूर्ती म्हणतात we want

complete satisfaction. श्रीमहाराज पूर्ण समाधान म्हणत असत. असमाधान का आहे? असुरक्षिततेची जाणीव का आहे?

**साधक ग** : मी आहे व मी असावे असे आपणांस नेहमी वाटते. मग प्रकृती चांगली असावी. खायला प्यायला चांगले असावे इत्यादी त्या वाटण्याचा (offshoots) विस्तार आहे.

**साधक क** : देहबुद्धीमुळे आणि द्वैतामुळे भीती वाटते.

**पू. बाबा** : हे उपनिषदात सांगितलेले तत्त्वज्ञान नको. आज आपली स्थिती अशी का आहे ते पाहू.

**साधक प** : त्रिपुटी आहेत तोपर्यंत भीती राहणारच.

**पू. बाबा** : जीवन म्हटले म्हणजे त्यात सुखदु:खाचे प्रसंग येणारच. त्यामध्ये मनाचे संतुलन ठेवल्याखेरीज भय जाणार नाही.

**साधक ब** : सुरुवातीला बाहेरच्या आघातांनी संतुलन बिघडेल पण सर्वकाही 'तो' करतो अशी खात्री झाली की समाधान राहील. खरोखर ही खात्री होणे अवघड आहे. ती 'त्याच्या' कृपेनेच होईल. कृपा झाली पाहिजे.

**पू. बाबा** : आपल्याला मृत्यूची भीती वाटते. मृत्यू म्हणजे काय याचा आपल्याला अनुभव नाही पण देह जाणार ही भीती वाटतेच. श्री. रामकृष्णपंत दामले जलोदराने (Dropsy) वारले पण शेवटपर्यंत ते नामस्मरण करीत होते. संसाराबद्दल काहीच बोलले नाहीत.

**साधक ग** : अमृत महोत्सवात प्रसिद्ध केलेल्या चैतन्य स्मरणात प्रा. वर्टीकरांनी त्यांच्या वडिलांच्या मृत्यूची हकिगत दिलेली आहे. बेशुद्धीतही त्यांच्या हातात माळ दिल्यावर ते ती फिरवू लागले! अशा रीतीने बेशुद्धीतही त्यांचे नाम श्रीमहाराजांनी चालू ठेवले होते याचा त्यांच्या मुलांना प्रत्यय आला.

**पू. बाबा** : डॉक्टर असा पाहिजे की रोगी पाहिल्याबरोबर त्याला काय झाले आहे हे त्याला समजले पाहिजे. अण्णासाहेब पटवर्धनांचे अप्रबुद्धांनी (श्री. पाळेकर) चरित्र लिहिले आहे, त्यात म्हटले आहे की रोग्याची नाडी पाहू लागले की ते भान विसरून जात. ते म्हणत की माझ्या नकळत मी आत जातो. श्रीमहाराज म्हणत की औषधाने रोगी मेला तरी आणि बरा झाला तरी डॉक्टरला आश्चर्यच वाटले पाहिजे.

ह्या नुसत्या गोष्टी ऐकून उपयोगी नाही. आपण केले पाहिजे. नामाने मस्त झाले पाहिजे. संत सांगतात आणि आपला पण अनुभव आहे ना!

श्रीरामकृष्ण म्हणत, या देहाकडून पाप झालेले नाही. 'सत्यवादाचें तप। मागा केलें बहुत कल्प।' असे ज्ञानेश्वर महाराज सांगतात. आपण निदान देहाने तरी वाईट करू नये.

**साधक प** : श्रीरामकृष्ण म्हणत, कलियुगात मनाने पाप न करणे फार अवघड आहे तेव्हां निदान देहाने तरी पाप करू नका. खरोखर रामकृष्णांनी आपल्याला केवढी सवलत दिली आहे.

**पू. बाबा** : वाणी हे कर्मेंद्रिय आहे. तेव्हा वाईट न बोलणे, न रागावणे हा अभ्यासच आहे. श्री. भाऊसाहेबांना तुम्हाला कधी राग येतो का म्हणून मी विचारले होते. तेव्हां ते म्हणाले, गेल्या ५० वर्षांत तरी मी रागावल्याचे मला आठवत नाही. नोकरीत असताना शिपायाना देखील ते अहो, जाहो म्हणत. वाणीचे हे तप करण्याचा अभ्यास करावा.

**साधक ड** : राग आला की मनाचे संतुलन नाहीसे होते.

**पू. बाबा** : ब्रह्मानंद, आनंदसागर ही थोर मंडळी. ब्रह्मानंद आनंदसागरांना दादा म्हणत. ही सर्वच मंडळी आपले दादा आहेत. त्यांच्याजवळ तक्रार करावी. आपण नामाव्यतिरिक्त इतर दृश्य गोष्टींत जास्त रस घेतो. नाम हे सर्वोच्च मूल्य वाटत नाही. ब्रह्मानंद महाराजांचे अनुकरण करून नामालाच सत्य मानले पाहिजे.

**साधक ब** : मार्गदर्शन घ्यायचे ते नामाचेच घ्यावे. हे शक्य आहे कारण श्रीमहाराज म्हणत की नामच मला मार्गदर्शन करीत असे. नाम शक्तिरूप असल्याने तेच नाम आपल्याला नाम घ्यावयाची शक्ती देईल. नामालाच सखा मानावे. तेच आपल्याला तारील. हा भाव आला तर नामाची संगत व्हावयाला मदत होईल.

**पू. बाबा** : पैसा, मानसन्मान इत्यादींचा त्यागच करावा लागेल.

## |९०| (११ ऑगस्ट १९८९)

आमच्यापैकी एका साधकांचा नातू आजारी आहे त्यामुळे आज ते आले नाहीत. ह्या गोष्टीचा उल्लेख करून पू. बाबा म्हणाले, आपण फार भितो. व्यवहारानुसार योग्य ते करावे आणि मग प्रारब्धावर सोपवावे. पण तसे होत नाही. आपल्या जिवाची उलघाल होते. श्रीमहाराज म्हणत की ताप आला की लगेच डॉक्टरकडे धावू नये. दोन-तीन दिवस वाट पाहावी. ते तुळशीचा काढा आणि इतर साधी आयुर्वेदीय औषधे घ्यायला सांगत. मला वाटते, त्या दृष्टीने

होमिओपाथी चांगली. कृष्णमूर्तीही होमिओपाथीची औषधे घेत असत. मागे, बऱ्याच वर्षांपूर्वी माझ्या उजव्या हाताच्या पंजाला मुंग्या येत. रक्तदाब वाढून अर्धांग होणार की काय असे वाटले म्हणून मग श्रीमहाराजांना सांगितले. ते म्हणाले, खूप वेळ लिहीत बसण्याचा हा परिणाम आहे. रात्री झोपण्यापूर्वी गरम पाण्यात थोडा वेळ पंजा बुडवावा. तसे केल्यावर बरे वाटू लागले. तसेच खूप वाचन किंवा जप झाला की डोके तापत असे. म्हणून श्रीमहाराजांना विचारले. त्यांनी विचारले की आंघोळ कशी करता? पहिला तांब्या डोक्यावर घेऊ नये. एक दोन तांबे पाणी अंगावर घेऊन मग डोक्यावर घ्यावे. तसे करू लागल्यावर तो त्रास थांबला.

पू. बाबा पुढे सांगू लागले; साधनासाठी पथ्ये आवश्यक आहेत. मी रात्री जेवत नाही. दोन-तीन वेळा थोडे लिंबू पाणी घेतो. श्रीमहाराजांनी तवकील, रवा किंवा साबुदाण्याची खीर घ्यावी म्हणून सांगितले. राजगिरा विचारल्यावर नको म्हणाले. अन्न साधे घ्यावे. श्रीमहाराजांचा आहार अतिशय साधा होता. त्यांना गोळा (घट्ट) वरण, तूप आणि शिळी भाकरी आवडत असे. एकदा मालाडला नागपूरची काही मंडळी आली होती. जेवायला, त्यांना आवडतो म्हणून भजेभात केला होता. सर्वजण जेवत होते. मधेच श्री. भाऊसाहेब तेथें येऊन गेले. त्यांनी विचारले की श्रीमहाराजांना नैवेद्य दाखवला ना? नंतर मी त्यांना याबद्दल विचारले तेव्हां ते म्हणाले, भजेभातच का, अगदी विष घ्यायचे झाले तरी श्रीमहाराजांना नैवेद्य दाखवून मग घ्यावे!

श्रीमहाराज म्हणत की संसारात फार संकटे असू नयेत तशी फार चांगली स्थितीही असू नये. दोन्ही सारखेच घातक आहेत. अफू बाजारातून आणून खाल्ली काय किंवा आपल्या शेतात पिकवून खाल्ली काय, परिणाम एकच. श्रीसमर्थांनी म्हटले आहे ते खरे आहे. संसारातील त्रिविध तापाने पोळलेलाच परमार्थाला अधिकारी होतो. श्रीमहाराज म्हणत, जगात चार प्रकारची माणसे असतात. १) आत झोपलेले आणि बाहेरही झोपलेले - मूढ २) आत झोपलेले आणि बाहेर जागे - प्रापंचिक ३) आत जागे आणि बाहेर झोपलेले - तुकाराम महाराजांसारखे संत ४) आत जागे आणि बाहेरही जागे - एकनाथ महाराजांसारखे संत.

**पू. बाबा (आमच्यापैकी एकांकडे पाहून)** : श्रीमहाराजांनी परमार्थाखेरीज संसारातले काही मागा म्हटले तर काय मागाल?

**साधक** : तसे काही सांगता येत नाही पण आहे ते टिकावे असे मात्र वाटते. नुकताच अकबरअलीच्या डिपार्टमेंटल स्टोअर्सची गिफ्ट कूपन्स मिळाली होती म्हणून तेथे गेलो होतो. तथापि तेथील कोणत्याच वस्तूची आपल्याला जरूर नाही आहे असे वाटले आणि काहीही न घेता परत आलो. तथापि हा अकरणात्मक भाग झाला. संसारात मिळालेले पुरे असे वाटले तरी आता परमार्थच हवा असे अजून वाटत नाही.

**साधक क** : नाम घेताना तळमळ वाटत नाही. दृश्य खरें वाटते तसे नाम खरें वाटत नाही.

**पू. बाबा** : तळमळ लागत नाही याला काय करावे असे मी श्रीमहाराजांना विचारले होते. श्रीमहाराजांनी विचारले, तळमळ लागलेली नाही याची तरी खरी तळमळ आहे ना?

मला नोकरी नव्हती तेव्हां काय करावे म्हणून श्रीमहाराजांना विचारले. श्रीमहाराज म्हणाले, मला काय आवडते ते सांगतो. तुम्ही जरीचा रुमाल बांधावा आणि ह्यांनी (सौ. आईंनी) जरीचे लुगडे नेसावे व दोघांनींही भिक्षा मागून खावे! एकदा ह्यांचा (सौ. आईंचा) पाय मुरगळला. खूप दुखत होते. श्रीमहाराजांना विचारले. ते म्हणाले, लगेच उपचार करावे. फ्रॅक्चर असेल काय म्हणून विचारले तेव्हां म्हणाले मला नाही तसे वाटत, इतक्यात डॉ. वैद्य तेथें आले. पाय पाहून त्यांनीही फ्रॅक्चर नाही म्हणून सांगितले आणि औषध दिले. थोडे दिवसांनी बरे वाटू लागले.

खरोखर श्रीमहाराज म्हणजे ज्ञानाचा साठा होता. बी. कॉम झाल्यानंतर श्रीपादची C. A. करायची इच्छा होती. रिझल्ट लागून दोन-तीन दिवस झाले तरी श्रीमहाराज हो म्हणेनात. नंतर म्हणाले बँकिंग हा विषय घेऊन एम्. कॉम करावे. C. A. च्या व्यवसायात वृत्ती शुद्ध राहणे कठीण. खरोखर त्यांनी सदैव सांभाळले आहे.

आपण नसतांना कोणाला विचारायचे असे एका भक्तांनी श्रीमहाराजांना विचारले. श्रीमहाराज म्हणाले, दोन मार्ग आहेत. १) रात्री झोपतांना सांगावे व सकाळी उठल्याबरोबर पहिल्यांदा जे मनात येईल तसे वागावे किंवा २) सर्व घटनेतील 'मी' काढून टाकून कानावर घालावे आणि मग आतून प्रेरणा येईल त्याप्रमाणे वागावे.

नंतर पू. बाबांनी कृष्णमूर्तींचे काही संवाद (conversations) वाचून दाखवले. कृष्णमूर्ती म्हणत की साधन एकट्यानेच करायचे असते. ते

एकांताला महत्व देत. समर्थांचाही एकांतावर भर होता. "एकांत मानला ज्याला। समजे त्याला हळूहळू॥" किंवा "जया एकांत साधला। सर्वांआधी कळे त्याला॥" असे त्यांनी म्हटले आहे. कृष्णमूर्तींवर प्रेम असणाऱ्या एक साधिका एकदा त्यांना भेटायला गेल्या तेव्हां कृष्णमूर्ती स्वयंपाक करीत होते. मदत करू का म्हणून त्यांनी विचारल्यावर You are welcome असे कृष्णमूर्ती म्हणाले. त्यांचे आईवर फार प्रेम होते. ते म्हणाले तिने सांगितलेल्या तीन गोष्टी सांभाळतो. १) हातपाय स्वच्छ धुवून मग खातो २) साधे अन्न खातो आणि ३) कोणतेही मादक वा उत्तेजक खाद्य अथवा पेय घेत नाही. तुम्हाला काय आवडते म्हणून विचारल्यावर म्हणाले, भात आणि सांबार.

पू. बाबा म्हणाले, श्रीमहाराज सांगत त्यानुसार नेहमी वागलो. एकदा कॉलेजला सुट्टी सुरू झाली म्हणून दुसऱ्या दिवशी पुण्याला जाणार होतो. निघण्यापूर्वी सकाळी जाऊ ना म्हणून विचारल्यावर श्रीमहाराज 'पाहू', म्हणाले त्यामुळे गेलो नाही. दुसऱ्या दिवशी 'जा' म्हणाले. आदले दिवशी मी ज्या गाडीने जाणार होतो त्या गाडीला अपघात झाला होता! श्री. भाऊसाहेब म्हणत की श्रीमहाराज सांगतात ते सरळ समजून घ्यावे. त्यातून अर्थ काढू नयेत.

प्रश्न निघाला की आम्ही काय करावे?

**साधक ग** : दुसरे काय करणार! नाम घेत रहावे. आज तरी, नाम घेण्याच्या मर्यादेपर्यंत मी पोहोचलो; ह्यापेक्षा जास्त नाम घेणे शक्य नाही असे वाटत नाही. तसे होईल तेव्हांच शरणागती येईल. साधनातील अहंकार संपेल.

**साधक ब** : आज तरी अहंकार हा आमचा driving force आहे. म्हणून जिद्दीने नाम घ्यावे. जिद्दीचा अपुरेपणा जाणवला की शरणागती येईल.

**साधक क** : राखालला ध्यान जमत नव्हते. शेवटी श्रीरामकृष्णांनी त्याच्या जिभेवर काहीतरी लिहिले आणि त्याची अडचण दूर झाली. श्रीमहाराजांनी तसे काहीतरी करावे.

**पू. बाबा** : ते करतील यात शंका नाही. पण भागवतातील एक कथा आठवली ती सांगतो. प्रल्हादावर नरसिंह प्रसन्न झाला आणि त्याला स्वर्ग देऊ लागला. प्रल्हाद म्हणाला मला एकट्याला स्वर्ग नको, सर्वांना दे. नरसिंह म्हणाला, ठीक आहे, कोण यावयाला तयार आहेत त्यांना विचारून ये. प्रल्हादाने अनेकांना विचारले पण प्रत्येकजण काहीतरी सबब सांगू लागला, कोणीही तयार होईना. शेवटी एक डुक्कर तयार झाले पण त्याने विचारले मी

येतो पण तेथे मला माझे भोजन मिळेल ना? स्वर्गात जाऊन देखील तेथे त्याला नित्याचे भोजन (घाण) पाहिजे होते. आपली स्थिती अशीच आहे. विषयांची ओढ त्या डुकराप्रमाणेच आहे.

**साधक क** : श्रीमहाराजांजवळ नामाचा आनंद मागावा, खरोखर आज आम्हाला आनंदाची कल्पनाच नाही.

**पू. बाबा** : त्यासाठी सत्संग पाहिजे. सत्संग नसेल तर सद्‍ग्रंथ वाचावे.

**साधक ग** : सद्‍ग्रंथ आणि संत यातील फरक सोनोपंत दांडेकर फार छान सांगत. ते म्हणत सद्‍ग्रंथ हे रस्त्यावरच्या पाटीसारखे असतात. उदाहरणार्थ, पाटीवर 'पंढरपूरकडे →' असे लिहिलेले असते. त्या रस्त्याने गेलात तर पंढरपूरला निश्चित पोहोचाल. पण वाटेत काय अडचणी येतील कोणास ठाऊक. ती पाटी त्याबद्दल काहीच सांगत नाही. याउलट संत म्हणतात तुला पंढरपूरला जायचे आहे ना? चल माझ्याबरोबर. ते रस्त्यातील अडचणीतून, खाचखळग्यातून सांभाळून हात धरून नेतात.

## |९१| (१८ ऑगस्ट १९८९)

पू. बाबांनी साधक ख यांना विचारले की परमार्थाखेरीज व्यवहारातले काही देतो असे श्रीमहाराज म्हणाले तर काय मागाल? ते म्हणाले की तसे काही मागावेसे वाटत नाही. पू. बाबा म्हणाले की तरीदेखील आपले पैशाचे प्रेम जात नाही. श्रीमहाराज पैशाला विष्ठेसारखे समजत. श्रीरामकृष्णांचे तर धातूच्या स्पर्शाने हात वाकडे होत. Puritan किंवा एखाद्या योग्यासारखे कडक वैराग्याचे जीवन असावे असे मी म्हणत नाही पण आपण सोयींच्या आधीन होतो ते होऊ नये. आज भाकरी खातांना कालच्या श्रीखंडाची आठवण होऊ नये असे श्रीमहाराज म्हणत. प्रकृती नीट ठेवावी. मला होणाऱ्या किडनीच्या त्रासावर श्रीमहाराजांनी धन्याचे पाणी घ्यावयाला सांगितले होते. ही पण उपाधीच; तथापि साधनासाठी तेवढे सांभाळावे.

**साधक ज** : नामाची श्रद्धा वाढावी आणि गुरूवरील श्रद्धा दृढ व्हावी यासाठी सद्‍गुरूंनी पुढे काय होणार ते सांगावे.

**साधक ब** : हे केवळ भविष्य सांगणे होईल. तसे त्यांनी सांगितले आणि ते खरें झाले तरी पुन्हा संशय निर्माण होणारच नाही असे नाही.

**पू. बाबा** : भक्ती, श्रद्धा ही पतिव्रता धर्मासारखी आहे. तेथें दुसरा विचार

असता कामा नये. नामात सत्संग आहे असे श्रीमहाराज म्हणत ते आपणांस विचाराने पटते का?

**साधक प** : आपण जेव्हा विचार करतो तेव्हां खरें म्हणजे दुसऱ्या कोणाचे तरी विचार आपले म्हणत असतो.

**साधक ग** : खरोखर आपल्याला स्वतंत्र विचार करता येत नाही. दुसऱ्यांचे विचारही आत्मसात झालेले नसतात. त्यात मोडतोड झालेली असते.

**पू. बाबा** : हे खरें आहे.

**साधक क** : विचारांपेक्षाही भाव पाहिजे आणि त्यासाठी श्रद्धा पाहिजे. विचार थांबतो तेथे श्रद्धा सुरू होते आणि त्या श्रद्धेला योग्य कृतीची जोड मिळाली की भाव निर्माण होतो.

**साधक प** : मी नाम घेतो हा भाव गेला पाहिजे. हा देहभाव गेल्याखेरीज खरें नामस्मरण होणार नाही.

**पू. बाबा** : नाम घेताना मूल आईच्या कुशीत जसे निश्चिंत असते तसे झाले पाहिजे. सद्‌गुरूंच्या कुशीत निश्चिंत झाले पाहिजे. ''मातेचिया खांदी बाळ नेणे शीण। भावना त्या भिन्न मुंडावया॥''

**साधक प** : आपण गुरु अथवा परमेश्वर बाहेर शोधतो ते चूक आहे. तो आतच आहे.

**साधक ग** : तथापि सगुणातूनच निर्गुणात जाता येईल.

**साधक ब** : श्रीमहाराजांकडे व्यवहाराखेरीज काही मागावयाचे झाले तर मी नामाची संगत मागेन.

**साधक प** : नामाची संगत ही पण जाणीवच आहे. म्हणजे नाम जाणिवेपर्यंत पोहोचले पाहिजे. आज जागृतीत मला माझी म्हणजे माझ्या देहाची जाणीव आहे. झोपेत त्याचाही विसर पडतो.

**साधक क** : नामाची संगत अवघड आहे. त्यापेक्षा सत्संगत व्हावी.

**पू. बाबा** : तीही अवघडच आहे. आणि ती झाली तरी कायम कशी राहणार? सद्ग्रंथांची संगत ही पण सत्संगतच आहे. ज्ञानेश्वरी, दासबोध यांसारखे ग्रंथ आपल्याला सांगण्यासाठीच लिहिले आहेत अशी भावना ठेवून वाचावे.

**साधक क** : श्रीमहाराजांनी म्हटले आहे की संतांनी लिहिलेले ग्रंथ हे त्यांच्या मृत्युपत्रासारखे आहेत. त्यांनीच सांगितले की एक मुलगा वडिलांनी

त्याला पाठवलेल्या पत्राची पूजा करीत असे पण त्यात सांगितलेले (उदाहरणार्थ, पैसे पाठव.) मात्र करीत नसे, तसे आपले होते.

**पू. बाबा** : खरोखर संतांनी आपली करुणा येऊन किती केले आहे! 'मेलों तरी जितें निजोनिया जागे। जो जो जे जे मागे देऊ तया॥' आपल्यासारख्यांना क्रमयोगच (क्रममुक्ती) खरा.

जगात सर्व संतांनी एक वातावरण तयार करून ठेवले आहे. सध्याच्या काळात जो नाम घेईल त्याचे काम कमी कष्टात करून द्यायला या वातावरणाची मदत होते. नाम घेतले की त्या वातावरणात जाता येते म्हणून सध्या नामाचे विशेष महत्त्व आहे. श्रीमहाराजांनी सांगितले आहे की गोंदवल्यास नामाचे पीक भरघोस आहे. तेथें त्यांनी खूप पेरून ठेवले आहे. जो थोडे नाम मनापासून घेईल त्याला मदत झाल्याशिवाय राहणार नाही. सामान्य माणसासाठी श्रीमहाराजांनी खूप ठेवले आहे. एकदा गोंदवल्यास वीज पडली तेव्हा श्रीमहाराज म्हणाले की इथे जो नाम घेईल त्याला असे विजेसारखे परमात्म्याचे दर्शन घडून जाईल.

## |९२| (२५ ऑगस्ट १९८९)

आम्ही गेलो तेव्हा पू. बाबांकडे एक गृहस्थ आले होते. कोकणातील त्यांच्या गुरूंनी त्यांना दत्ताची उपासना करायला सांगून मंत्र सांगितला व त्याचा जप नेमून दिला. पुढे सोलापूरच्या काडसिद्धेश्वर मठातील कोणी सत्पुरुषांनी त्यांना वेगळाच मंत्रजप सांगितला म्हणून ते पुन्हा कोकणातील गुरुंकडे गेले. त्यांनी मूळ दिलेल्या मंत्राचाच जप करा, त्यात तुमचे हित आहे असे सांगितले. त्या गृहस्थांना काय करावे कळेना म्हणून ते पू. बाबांकडे आले होते. पू. बाबांनी कोकणातील गुरूंनी दिलेलेच साधन करा, त्यात तुमचे हित आहे असे सांगितले. पू. बाबा म्हणाले, अशा बाबतीत दुसऱ्या कोणी काही सांगितले तरी तिकडे लक्ष देऊ नये, झापडे लावावी. सांगणाऱ्याचा अधिकार हवा; नुसती विद्वत्ता उपयोगाची नाही. पाहिल्याबरोबर कोणाचे काय साधन आहे, त्याचे कशात हित आहे ते समजले पाहिजे.

ह्या संदर्भात पू. बाबांनी एक जुनी हकिगत सांगितली. एकदा एक माणूस गोंदवल्यास श्रीमहाराजांकडे आला. त्याची चौकशी वगैरे न करता श्रीमहाराजांनी त्याला दत्तमंदिरात जावयाला सांगितले. तेथे दोन-तीन दिवस राहून तो पुन्हा श्रीमहाराजांना भेटला तेव्हा त्यांनी त्याला गिरनार पर्वतावर

जाऊन उपासना करण्यास सांगितले. पुढे काही दिवसांनी श्री. गोपाळराव जोशी यांनी श्रीमहाराजांना आपण असे का केले म्हणून विचारले तेव्हा ते म्हणाले की त्या माणसाची दत्ताची उपासना आहे. त्याची खरी श्रद्धा आहे. येथें त्याचे साधन नीट झाले नसते.

ते गृहस्थ गेल्यानंतर पू. बाबा म्हणाले, हे असे होते. आपली देखील आपल्या गुरूंवर श्रद्धा आहे. तथापि गुरूंपेक्षाही त्यांच्या सांगण्यावर श्रद्धा बसणे कठीण आहे. तशी ती असती तर नाम आहे तेथे मी आहे ह्या त्यांच्या सांगण्यावर श्रद्धा बसून आपण पुढे गेलो असतो. पाश्चिमात्य संशोधकांजवळ विचार आहे पण श्रद्धा नाही. श्रद्धेला भावनेचे अंग आहे.

**साधक प** : असे का म्हणता? ते संशोधक जे करतात त्यावर त्यांची निश्चितच श्रद्धा असते. त्यांचे विचार व्यावहारिक जगापुरते किंवा भौतिक जगापुरते मर्यादित असतील पण ते ठाम असतात. त्यात संशय नसतो.

**पू. बाबा** : (साधक ख ना) श्रद्धा निर्माण करता येईल का आणि कशी?

**साधक ख** : श्रवणाने श्रद्धा निर्माण होईल.

**पू. बाबा** : होय; पण ते श्रवण कसे पाहिजे? कृष्णमूर्ती Listening ला फार महत्व देतात. आपण खरे श्रवण करीत नाही. अर्थात श्रवण करणाऱ्याची भूमिका जशी तयार पाहिजे तसा सांगणाराही सत्पुरुष आणि आप्त (आपले हित जाणणारा) पाहिजे. त्याच्या सांगण्याचा निश्चित परिणाम होतो. खरोखर आपल्याला नामाच्या सामर्थ्याची कल्पना नाही. सर्व विश्वच शब्दातून निर्माण झाले. उपनिषदात गुरुकडे श्रद्धासंपन्न होऊन (श्रद्धावित्तो भूत्वा) जावे म्हणून सांगितले आहे.

**साधक ब** : श्रद्धा निर्माण व्हावी अशी महत्‌ची म्हणजे बुद्धीची प्रार्थना करावी.

**पू. बाबा** : विश्वाच्या निर्मितीत जो पहिला पदार्थ निर्माण होतो त्याला महत्‌ म्हणतात. आभ्यंतरिक दृष्टीने यालाच बुद्धी म्हणतात. आपल्या दैनंदिन जीवनातील व्यवहारात आपल्याला अनेक गोष्टी कराव्या लागतात, पण त्यांचा आग्रह नसावा. लो. टिळकांनी गीतारहस्यातील कर्मयोगावरील प्रकरणात म्हटले आहे की कर्माचा आग्रह असावा पण कर्मफल मिळालेच पाहिजे हा आग्रह नको. आग्रह म्हणजे नेमके काय?

**साधक प** : आग्रहात मीपणा असतो, तसेच ठामपणा असतो.

**साधक ग** : आग्रहात अमूक घडावे अथवा घडू नये या विचाराने आपल्याला घट्ट पकडून ठेवलेले असते.

**साधक प** : नाम घेतांना देखील मी नाम घेतो हा आग्रह गेला पाहिजे.

**साधक ब** : व्यवहारातील आमच्या सर्व गोष्टी आग्रह धरल्याखेरीज होत नाहीत.

**साधक ज** : अमूक वाजताची गाडी मला पकडावयाची आहे. त्याकरता आधी सर्व आवरले पाहिजे, हा आग्रह धरल्याखेरीज कसे होईल?

**साधक ड** : हा प्रयत्न पाहिजेच पण आग्रहामुळे जो ताण (tension) येतो तो आग्रह सोडला तर येणार नाही.

**साधक ज** : आग्रहाचे मूळ वासनेत आहे. ठराविक वेळेला एका गृहस्थाला भेटलो तर मला ऑर्डर मिळणार आहे; अशा वेळी होणारी धावपळ पैसे मिळविण्याच्या मूळ वासनेतून निर्माण झालेली आहे. त्यामुळे व्यवहारातील आग्रह केवळ यांत्रिक (mechanical) आहे असे म्हणता येणार नाही.

**साधक प** : आपल्या सर्व कर्मातला 'मी' काढून कर्म केले की आग्रह जाईल.

**साधक ग** : आपल्या सर्व क्रिया देश-काल-निमित्ताने मर्यादित असतात. 'मी' काढायचा म्हणजे ही परिमाणे नाहीशी करण्यासारखे आहे.

**पू. बाबा** : कारण व कार्य हा संबंध राहीलच. फक्त कारण सर्वस्वी माझ्या ताब्यात यावे हा आग्रह नसावा. जग आहे तसेच चालेल फक्त आपण तिकडे कसे पहावयाचे हा प्रश्न आहे. यासाठी देहबुद्धी गेली पाहिजे. वासना देहबुद्धीतून येतात. देहबुद्धी नाहीशी करण्यास अखंड अनुसंधानासारखा दुसरा मार्ग नाही.

### |९३| (१ सप्टेंबर १९८९)

पू. बाबांनी एक-दोन जुन्या गोष्टी सांगितल्या.

१) श्री. बळवंतराव पाठक मास्तर (रिटायर्ड पोस्ट मास्तर) हे श्रीमहाराज असतांना गोंदवल्यास राहावयास गेलेले पहिले गृहस्थ. त्यांना दोन मुली होत्या. त्यांची लग्ने व्हावयाची होती. तशात धाकट्या मुलीची मान वाकडी होती, त्यामुळे तिचे लग्न कसे होईल ह्यांची पाठक मास्तरांना चिंता वाटत असे. त्यांची पत्नी म्हणे, 'महाराज पाहतील; तुम्ही का चिंता करता? आणि नसले लग्न व्हायचे तर होणार नाही.' अशी विशेष शिकलेली नसली तरी

निष्ठावान माणसे महाराजांजवळ होती. श्रीमहाराजांच्या परिसस्पर्शाने त्यांचे सोने झाले.

२) त्यावेळचे दुसरे रिटायर्ड पोस्ट मास्तर श्री. होंबळ ह्यांच्या पत्नीस फीट येत असे. एकदा ते श्रीमहाराजांना म्हणाले की महाराज हिला मुक्ती द्या. श्रीमहाराज म्हणाले, हे बरे आहे; हलवायाच्या घरावर तुळशीपत्र! त्यांना विचारा. त्यांना विचारल्यावर त्या म्हणाला, मला मारायला निघालात का! असे विनोद.

पू. बाबा म्हणाले, प्रपंचातील सुखदु:खांच्या हेलकाव्याने आपण अस्वस्थ होतो व आपले नाम सुटते. प्रपंचात सर्व काही चांगले असणे वाईटच कारण त्यामुळे आसक्ती वाढते. ते गोड विष आहे. ते हमखास पारमार्थिक मृत्यू घडवून आणते.

दु:ख म्हणजे नेमके काय? मला जे अप्रिय वाटते ते दु:ख. शारीरिक पातळीच्या पलीकडे ते मनात असते.

**साधक ख** : मी व माझे ह्यात सगळे दु:ख आहे. ते गेले की दु:ख गेले.

**साधक ग** : साधनात अशी एक अवस्था येईल की जे घडते आहे ते मला नकोसे वाटेल. पण घडते आहे ते बरोबरच आहे, ते सद्गुरूंच्या इच्छेने घडते आहे असे वाटेल.

**पू. बाबा** : हे बरोबर आहे. मला दु:ख सोसण्याची शक्ती नाही, ती द्या म्हणावे, दु:खच नको म्हणू नये. त्रिगुणात्मक जगामध्ये सुख-दु:ख वाटावे अशा घटना घडणारच. पण अहंकार आणि ममत्व गेले की जग तसेच चालेल मात्र साधक सुखदु:खापलीकडे जाईल. गीतेत प्रशान्तात्मा विगतभी: असे म्हटले आहे. अहंकार आणि ममत्व जायला राम कर्ता ही भावना वाढली पाहिजे. त्याची खूण म्हणजे नाम. त्याचे अखंड स्मरण झाले पाहिजे.

## |९४| (१५ सप्टेंबर १९८९)

**पू. बाबा** : श्रीमहाराजांनी मला सांगितले की लोकांना नामाला लावावे आणि मला तर काही अनुभव नव्हता. तेव्हा श्रीमहाराज म्हणाले की कोणी काही शंका विचारल्या तर त्यांना सांगावे श्रीमहाराजांना विचारा. आता पुष्कळ वाचन, साधन झाले आहे. आता त्यांच्या कृपेने तसा प्रसंग येत नाही. लोकांचे शंका निरसन करता येते.

एकदा श्रीमहाराज म्हणाले, समर्थ रामदासांनी सांगितले आहे की सर्व काही करा पण कशात आसक्त होऊन राहू नका: कशात गुंतू नका. संत एकनाथांनी सांगितले आहे की गुरूची पूजा करा आणि नामस्मरण करा. ज्ञानेश्वरांनी सांगितले आहे की गुरूंना वंदन करा आणि कर्माचे फल ईश्वराला अर्पण करा.

असाच आणखी एकदा त्यांनी प्रश्न केला की संतांमध्ये खरा चांगला संसार कोणाचा झाला? मी म्हणालो, नाथांचा. श्रीमहाराज म्हणाले, नाही, नामदेवांचा. दासीसुद्धा त्यांच्या घरचे सर्वजण नामाला लागले होते. असे एकचित्ताने जे घर चालते तो संसार चांगला.

श्रीमहाराज म्हणत, संत हे गेल्यावरही हवेसे वाटतात. तसे आपण गेल्यावरही लोकांनी म्हटले पाहिजे की माणूस गोड होता. आपण चांगल्या स्मृती ठेवून गेले पाहिजे. पू. बाबा पुढे म्हणाले, मला हे साधले नाही पण आपण गेल्यावर आपल्या मागे संबंधितांनी चांगले म्हणावे असे वागावे. आपल्याला अजूनही श्रीमहाराजांचे प्रेम लागत नाही; अनन्य आधार वाटत नाही. तरी पण एक महत्त्वाची गोष्ट लक्षात ठेवा. दुसऱ्या संतांच्या दर्शनाला जाणे काही गैर नाही. परंतु ते आपल्याला काही तरी देतील (पारमार्थिक मदत) अशी अपेक्षा बाळगणे हे चूक आहे. पारमार्थिक मदत फक्त श्रीमहाराजांकडेच मागावी. हाच अनन्यभाव.

एकदा श्रीमहाराजांना म्हणालो की, पू. तात्यासाहेबांची नम्रता घेण्यासारखी आहे. यावर श्रीमहाराज म्हणाले की अभिमान करावयासारखे त्याच्याजवळ आहेच काय? श्रीमहाराज सर्व लहानथोरांना अहो, जाहो करीत पण तात्यासाहेबांना मात्र एकेरी संबोधीत. पू. तात्यासाहेब म्हणत की त्यामुळे मी मोठा झालो असे कधी वाटलेच नाही. एखादी साधारण मुलगी मोठ्या घरी पडली तर तिला जसे वाटते तसे तात्यासाहेबांना आपल्या लायकीपेक्षा थोर सद्गुरु आपल्याला भेटले असे वाटत असे.

श्री. कृष्णशास्त्री उप्पिनबेटिगिरी (धारवाड) यांना काशीच्या संस्कृत पाठशाळेत पं. मालवीयांनी प्रधान अध्यापक म्हणून बोलावले होते पण त्यांना तेथे जाऊ नका असे श्रीमहाराजांनी सांगितले. (पू. बाबा म्हणाले की कृष्णशास्त्री मोठे पंडित होते पण पाठशाळेत व्यवस्थापन त्यांना जमले नसते.) पुढे एकदा त्यांना काशीला पाठशाळेत व्याख्यान देण्यासाठी बोलावले होते. ते त्यांच्या धोतर पंचा अशा नेहमीच्या पोशाखात व्याख्यानाला निघाले तेव्हां श्रीमहाराजांनी त्यांना थांबवले व चांगले करवतकाठी धोतर नेसायला दिले.

पांघरायला शाल दिली व मग पाठवले. आपल्या माणसांबद्दल श्रीमहाराजांना असे प्रेम होते, ओढ होती.

पू. बाबा पुढे सांगू लागले. डॉ. कूर्तकोटी म्हणाले की नऊ वर्षे मी श्रीमहाराजांच्या अखंड सहवासात होतो. अगदी एखाद्या गुप्त पोलिसासारखा त्यांच्या मागे असे. श्रीमहाराजांच्या वागण्यात तीळमात्र आतबाहेर नव्हते. शंकराचार्यांनी जे संस्कृतात लिहिले ते श्रीमहाराज सोप्या मराठीत बोलले. त्यांचे सांगणे कितीजणांना समजले कोणास ठाऊक!

श्रीमहाराजांच्या साध्या बोलण्यातही किती अर्थ भरलेला असे. उद्‌हारणार्थ, श्रीमहाराज म्हणाले, ''स्मरण ही कृती आहे, विस्मरण ही वृत्ती आहे.'' विचार केला की लक्षात येते की नाम घेतो अशी कृती करावी लागते आणि विस्मरण हे अज्ञानाचे लक्षण असल्याने ते सहज होते. काही वेळा जपाची तीव्रता कमी होते. अशा वेळी श्रीमहाराजांच्या चरित्रातला काही भाग वाचला की नंतर जप चांगला होतो असा अनुभव आहे. खरोखर श्रीमहाराजांचे जीवन हे दिव्य जीवन आहे आणि तरीही श्रीमहाराज आपल्यातले वाटतात.

एकदा श्रीमहाराजांबरोबर गदगला गेलो होतो. तेथे ज्या घरी गेलो होतो तिथले एक तान्हे मूल फार रडत होते. त्याच्या रडण्याचे कारण डॉक्टरांनाही समजेना. मी पू. तात्यासाहेबांना पेटीवर बसायला सांगितले व ते मूल का रडते आहे ते पहा व काही उपाय करा अशी श्रीमहाराजांना विनंती केली. श्रीमहाराज त्या डॉक्टरना म्हणाले की डॉक्टर त्या मुलाची मान लचकली आहे का पहा व काही औषध लावा. तसे केल्यावर ते मूल रडायचे थांबले! नंतर मी श्रीमहाराजांना विचारले की आपण हे कसे ओळखले? ते म्हणाले की कोणत्याही जीवाशी तादात्म्य झाले तर त्याचे सुखदु:ख हे आपलेच सुखदु:ख होते. हे सांगून ते पुढे म्हणाले, खरे तर डॉक्टर असा हवा की पेशंटला काय होते आहे हे त्याला लगेच समजावे.

## ।९५। (१९ सप्टेंबर १९८९)

मुक्काम गोंदवले नाम साधन अभ्यास शिबिराचा पहिला दिवस.

श्रीमहाराजांनी शरीरशुद्धीसाठी पुढील उपाय सांगितला आहे. आठ दिवसातून एकदा उपास करावा. त्या दिवशी एखादे फळ घ्यायला हरकत नाही. पंधरा दिवसातून एकदा आयुर्वेदिक सारक घ्यावे. उदाहरणार्थ, सोनामुखी + हिरडा + मीठ. नंतर लिंबाच्या पाण्यावर उपवास करावा.

सकाळच्या प्रवचनात पू. बाबा म्हणाले की समाधी ही पाचही कोषात असते. आसनसिद्धी झाली की अन्नमय कोषाची समाधी जमेल कारण आसनसिद्धी झाली की देहाचा विसर पडतो.

प्रपंचात दुसऱ्याशी कठोर व्हावे लागते तर परमार्थात स्वत:शी कठोर व्हावे लागते. शरीर शुद्ध ठेवल्याखेरीज सूक्ष्माशी संबंध जोडण्याइतके संवेदनशील (sensitive) होणार नाही.

**प्रश्न** : अशी शिबिरे भरवून परमार्थ साधेल का?

**पू. बाबा** : माणसावर आनुवंशिकतेचा आणि परिस्थितीचा पगडा असतो. आनुवंशिक गोष्टी बदलणे आपल्याला शक्य नाही, ते आपल्या हातात नाही. पण उत्तम परिस्थितीचा म्हणजे सत्संगतीचा परमार्थात खूप फायदा होतो. ही सत्संगत शिबिरात मिळणे शक्य आहे. आपण तशी दृष्टी ठेवली तर परमार्थात पाऊल पुढे पडण्यास शिबिराचा उपयोग होईल.

## |९६| (२० सप्टेंबर १९८९)

मुक्काम गोंदवले. शिबिराचा दुसरा दिवस.

सकाळी पू. बाबांनी शवासनाचा अभ्यास सांगितला. त्यानंतर पूर्ण प्रवचनात मानसपूजेचे महत्व सांगितले. आपले सद्‌गुरु आपल्या घरी प्रत्यक्ष आले तर आपण त्यांना जे उपचार करू तेच उपचार ते आले आहेत अशी कल्पना करून मनाने करणे म्हणजे मानसपूजा. साधकाच्या दृष्टीने मानसपूजेचे फार महत्त्व आहे. ह्या संदर्भात त्यांनी तीन उदाहरणे सांगितली.

१) श्री. म्हासुर्णेकर शास्त्री गोंदवल्यास आले असतां त्यांच्या समोरच श्री. महाराज म्हणाले, काय करावे, दोन दिवस झाले शास्त्रीबोवांची भेट नाही. असे दोनदा झाल्यावर शास्त्रीबोवांच्या लक्षात आले की दोन दिवस त्यांनी मानसपूजा केली नव्हती. नंतर ती केल्यावर श्रीमहाराज पुन्हा त्यांची भेट झाली नाही असे म्हणाले नाहीत. यावरून मनाने केलेली पूजा सद्‌गुरूंना पोचते हे लक्षात येईल.

२) श्री. दीक्षित (रामायणी) यांच्या आजोबांची गोष्ट. त्यांना एकदा प्रश्न पडला की शबरीने कोणते साधन केले? मानसपूजेत त्यांनी हा प्रश्न श्रीरामप्रभूंना विचारला. म्हणाले की हे मारुतीला विचारावे. त्यांनी मानसपूजेतच मारुतिरायांस आवाहन करून तोच प्रश्न विचारला. ते म्हणाले की श्रीरामप्रभूंची अखंड वाट पाहणे हेच साधन तिने केले.

३) सांगलीचे श्री. पागा फडणीस यांनी काशीस देह ठेवला. परत येतांना त्यांच्या पत्नीबरोबर पू. बाबा होते. त्या रडतच होत्या. रात्री १२॥ नंतर त्या शांत झाल्या. नंतर पू. बाबांनी ह्याचे कारण विचारले. त्या म्हणाल्या की मी श्रीमहाराजांची मानसपूजा केली तेव्हा श्री. फडणीस मला श्रीमहाराजांशेजारीच दिसले. ही केवळ आपली कल्पना आहे काय असे माझ्या मनात आले तेव्हां श्रीमहाराज म्हणाले, संशय नको, खरोखरच ते माझ्याकडे आले आहेत. आता हे समजल्यावर दु:ख उरले नाही.

**|९७|** (२१ सप्टेंबर १९८९)

मुक्काम गोंदवले. शिबिराचा तिसरा दिवस.

आज सकाळी पू. बाबांनी गोव्यातील एका साधकांची हकिगत सांगितली. एकदा गोव्यातील त्यांच्या गावाहून गोंदवल्यास येण्यासाठी ते घरातून श्रीमहाराजांना नमस्कार करून निघाले. काही कारणाने त्यांना कोल्हापुरात एक रात्र राहावे लागले. त्यांना एकसारखे वाटू लागले की आता आपल्याला गोंदवल्याला पोचायला उशीर होणार. तिकडे श्रीमहाराज आपली वाट पहात असतील. नंतर गोंदवल्यास पोचल्यावर ते दर्शनाला गेले तेव्हा समाधीच्या गाभाऱ्यातून त्यांना शब्द ऐकू आले ''बाळ, तुझी मी वाट पहात होतो.''

साधक ब पू. बाबांना म्हणाले. शिबिरात तुम्ही लोकांनी विचारलेल्या शंकांना उत्तरे देता पण उत्तर मिळाल्यावर शंका तशीच राहते की काही फायदा होतो ?

**पू. बाबा** : शंका बहुधा दोन प्रकारच्या असतात. बौद्धिक शंका बरोबर उत्तर मिळाले की नाहीशा होतात. पण भावनेच्या बाबतीतील शंका मात्र एकतर आचरणाने जातील किंवा सत्पुरुषांच्या वचनावर विश्वास ठेवल्याने जातील. आप्तवाक्य प्रमाण मानणे हा शंका नाहीशा करावयाला चांगला मार्ग आहे.

कोणतीही वासना त्याबद्दल विचार केल्याने, चिंतन केल्याने दृढ होते. श्रीमहाराज भुरु भुरु पडून नंतर घट्ट होणाऱ्या बर्फाचे (हिमवर्षावाचे) उदाहरण देत असत. सत्पुरुषांच्या किंवा सद्गुरूंच्या वचनांचे चिंतन केले तर त्याची साधन दृढ व्हावयाला निश्चित मदत होईल.

पू. बाबांनी आज निरूपणात एक गोष्ट सांगितली होती. एका प्राथमिक शाळेत परीक्षकांनी मुलांना प्रश्न विचारला की शहामृगाला पाय किती ? सर्व

मुले म्हणाली, चार. पण त्यांच्यातील एक मुलगा म्हणाला, तीन. तेव्हा बरोबर उत्तराच्या जवळचे उत्तर म्हणून परीक्षकांनी त्याला बक्षीस दिले! त्या मुलासारखी माझी अवस्था आहे. तुम्ही चार म्हणता मी तीन म्हणतो म्हणजे दोघेही अज्ञानीच.

ह्या गोष्टीचा उल्लेख करून संध्याकाळी साधक व पू. बाबांना म्हणाले, आम्हाला माहीत आहे की तुम्हाला बरोबर उत्तर माहीत आहे पण तुम्ही ते सांगत नाही. आपली खरी भेट आम्हाला अजून झालेली नाही. पू. बाबांनी हसून तो विषय सोडून दिला.

**|९८|** (२२ सप्टेंबर १९८९)

मुक्काम गोंदवले. शिबिराचा चौथा दिवस.

सकाळच्या प्रवचनात अवधानाबद्दल पू. बाबा म्हणाले की अवधान दोन प्रकारचे असते. १) एकाग्र - हे योगाने साधते. २) समग्र - हे भक्तीने साधते.

साधन तळमळीने होण्यासाठी दोन गोष्टी हव्या १) मृत्यूची जाणीव आणि २) नामानेच मला सद्‌गती मिळेल. तेच माझ्या कल्याणाचे आहे अशी निष्ठा. आयुष्याचा भरंवसा नाही असे मनापासून वाटले तर नामाची खरी निकड वाटेल. प्रेम वाढायला श्रीमहाराजांनी तीन उपाय सांगितले आहे.

१) आपलेपण - हे बहुधा पूर्वजन्मापासून आलेले असते.

२) नड - त्याशिवाय जगणे व्यर्थ वाटले पाहिजे.

३) अखंड सहवास - साधन ही पूर्णवेळ सावधान राहून करावयाची गोष्ट आहे.

**|९९|** (६ ऑक्टोबर १९८९)

मालाडला पू. बाबांच्या घरी.

**पू. बाबा :** आपले कर्तृत्व किती लटके आहे हे लक्षात यावयाला सध्याचा काळ फार चांगला आहे. अशा वेळी स्वत:कडे साक्षीभावाने पहायला शिकले पाहिजे. गुरु कर्ता आहे आणि जीवनात जे जे घडते ते सर्व मी केवळ पहातो आहे असे वाटले पाहिजे. आपले एक मनच दुसरे मन बरोबर वागत नाही म्हणून आपणास सांगत असते पण आपण तिकडे लक्ष देत नाही. मनाने

मनाचे नियमन करणे हाच विवेक. असा विवेक करता करता साक्षीभावाने नाम चालू राहिले की जीव त्यात रंगून जाईल.

**साधक ज** : आज जगात पाप वाढले आहे याचे कारण प्राणिसृष्टीतील जास्त जीव मानव योनीत आले असावे काय?

**पू. बाबा** : ते कसे सांगता येईल? हे अतींद्रिय ज्ञान आहे.

**साधक ग** : ह्या बाबतीत आपली चार युगांची कल्पना बरोबर वाटते.

**पू. बाबा** : ते काहीही असो; आजचे जग जास्त भोगवादी झाले आहे आणि शास्त्राच्या व तंत्रज्ञानाच्या प्रगतीमुळे शरीरभोगाची असंख्य साधनेही उपलब्ध होत आहेत. ह्या अशा परिस्थितीत साधन स्थिर होण्यासाठी चिंतन **(reflective thinking)** आवश्यक आहे. भगवंताच्या कोणत्याही एका भावाचे चिंतन करावे. उदाहरणार्थ, तो सर्वशक्तिमान आहे, किंवा तो सर्वव्यापी आहे, सर्वकर्ता आहे इत्यादी. श्रीमहाराज म्हणत की मी कोणाचेही अंतःकरण कधी दुखवले नाही. याचा अर्थच ते सर्वव्यापी होते. दुसऱ्याच्या अंतःकरणातही मीच आहे अशी जाणीव झाली की त्याचे अंतःकरण कसे दुखवणार? सर्वाभूतीं भगवद्भाव ही श्रेष्ठ अवस्था आहे.

**साधक क** : कोणत्या भावाचे चिंतन करायचे हे ज्याच्या त्याच्या मनोवृत्तीवर अवलंबून राहील.

**पू. बाबा** : सर्वव्यापित्व नाही जमले तर तोच सर्व करणारा आहे - राम कर्ता ह्या भावाचे चिंतन करावे.

**साधक क** : तेवढेच नाही; तो नुसता सर्वकर्ता नाही, तर माझे हित करणारा आहे असे चिंतन केले पाहिजे.

**पू. बाबा** : होय; काही वेळा त्याची कृती कठोर वाटेल पण ती माझ्या हिताची आहे असे वाटले पाहिजे. नरहरीबाबा ब्रह्मसाक्षात्कार झाल्याखेरीज अन्नग्रहण करणार नाही म्हणून विहिरीच्या काठावर हटून बसले होते. तेव्हां श्रीमहाराजांनी त्यांच्या डोक्यात खडावा मारल्या आणि त्यांच्या डोळ्यांतून पाणी आल्यावर त्यांना आपल्या हृदयाशी धरले. असे केले नसते तर हा वेडा झाला असता असे ते नंतर म्हणाले. खरोखर गुरूंबद्दल कृतज्ञतेचाच भाव पाहिजे. माझी लायकी ती काय आणि तरी त्यांनी मला हाताशी धरले असे वाटले पाहिजे.

**साधक प** : साक्षीभावाने नाम होणे अवघड आहे. आज नाम घेऊ लागले की निदान सगळ्या चिंता नाहीशा होऊन मोकळे वाटले पाहिजे.

**|१००|** (१३ ऑक्टोबर १९८९)

**पू. बाबा** : कृष्णमूर्ती काळापलीकडे, विचारापलीकडे जा म्हणतात ते बरोबर आहे; कारण त्याशिवाय स्वत:कडे साक्षीभावाने पहाता येणार नाही. आपण कालाच्या प्रवाहात आहोत. आपले सर्व संदर्भ कालाधीन आहेत. स्थलापलीकडे जाण्याचा कृष्णमूर्तींचा विशेष आग्रह दिसत नाही. पण कालापलीकडे गेल्याखेरीज तटस्थ होता येणार नाही. अर्थात हा काल psychological आहे. व्यवहारात physical काळाचे भाव ठेवावेच लागेल. उदाहरणार्थ, कालातीत व्हावयास सांगताना कृष्णमूर्ती तासभरच व्याख्यान देत. श्रीमहाराजही म्हणत की काळाच्या उरावर नाचता आले पाहिजे. नामस्मरण हा त्यासाठी उत्तम उपाय आहे. सामान्य माणसाला विचाराने कालातीत होणे साधणार नाही.

नामाच्या बाबतीत श्रीमहाराज तीन महत्त्वाच्या गोष्टी सांगत असत.

१) आजपर्यंत कितीतरी लोकांनी घेतले तरी नाम तसेच आहे. त्यात कमतरता आलेली नाही. कारण नाम अनंत आहे.

२) दृश्यापलीकडील जगाला नाम जोडते म्हणून नाम हा दृश्यापलीकडील जगाला जोडणारा दुवा आहे.

३) नाम सर्वव्यापी आहे. तो मूळ ॐकार आहे. त्यातून सर्व जग निर्माण झाले. त्यामुळे नाम व नामी अभिन्न आहेत.

**साधक ब** : समर्थांना त्यांच्या शिष्याने किती दिवसात मुक्ती होते असा प्रश्न विचारला. समर्थांनी त्यासंबंधी सांगतांना म्हटले की साधनात मुख्यत: व्यग्रता, आळस आणि झोप हे तीन विक्षेप येतात. या तिन्हीपैकी व्यग्रता कशी नाहीशी करावयाची?

**पू. बाबा** : आपल्या गुरूसंबंधी, त्यांच्या दयेसंबंधी सतत चिंतन केले आणि सत्संग ठेवला तर व्यग्रता नाहीशी होईल.

**साधक प** : जोपर्यंत 'मी' साधन करतो असे वाटते तोपर्यंत व्यग्रता राहणारच. नामाबरोबरच इतर ज्या गोष्टी 'मी' करतो त्या मनात येणारच. म्हणून राम कर्ता हा भाव मनात ठसला तर व्यग्रता कमी होईल कारण मग साधन करणेही माझ्या हातात नाही असे खरें खरें वाटेल.

**साधक ज** : ही शरणागती विचाराने येईल की भावनेने?

**पू. बाबा** : ते प्रत्येकाच्या मनोवृत्तीवर अवलंबून राहील. आपला एक विचार जास्त वेळ टिकत नाही तेव्हां विचारापेक्षा भावनेवरच भर द्यावा लागेल.

**साधक ब** : एकसारखे नामस्मरण होत नाही. नामात मी आहे असे श्रीमहाराजांनी सांगितले असूनही तसे वाटत नाही. अंधारात माणूस आहे अशी त्याच्या आवाजावरून खात्री होते तसे जरी नामस्मरण करतांना त्यांचे अस्तित्व जाणवले तरी साधनात वाढ होईल.

**पू. बाबा** : ज्यांना त्यांच्या अस्तित्वाचे अनुभव येतात त्यांनाही नंतर हा आपला भ्रम होता काय असे वाटू लागते असे मी पाहिले आहे. म्हणून हे संशयाचे भूत आहे तोपर्यंत त्यांचे अस्तित्व जाणवूनदेखील खरी निष्ठा आणि तळमळ निर्माण होणार नाही.

गेल्या महिन्यात गोंदवल्यास नामसाधन अभ्यास शिबीर झाले. त्यानंतर परत निघण्याच्या दिवशी म्हणजे रविवार दि. २४ सप्टेंबर रोजी त्यांना आलेला अनुभव पू. बाबांनी सांगितला. सकाळी ६ वाजता ते समाधीच्या दर्शनाला गेले तेव्हां तेथे पुजाऱ्याखेरीज कोणी नव्हते. पू. बाबांनी समाधीला नमस्कार केल्यावर "मी पहात होतो, ऐकत होतो, चांगले वाटले." असे शब्द ऐकू आले!

**पू. बाबा** : (साधक ग ना) महाराज एकसारखे जवळ आहेत असे वाटू लागले तर काय होईल?

**साधक ग** : वा! खरोखर असेच घडावे ही प्रार्थना आहे. असे झाले तर आणखी काय पाहिजे? साधन वाढेलच.

**पू. बाबा** : श्रीमहाराज शिकलेले नव्हते तरी ते ज्ञानाचे भांडार होते. एकदा कॉलेजात Suggestibility बद्दल शिकवायचे होते व वाचून झाले नव्हते म्हणून त्याबद्दल श्रीमहाराजांना विचारले तेव्हां सूचनेने मोठे कार्य कसे होऊ शकते ते त्यांनी सांगितले.

संतांचे संतत्व बाहेरून ओळखता येत नाही. गुरुदेव रानडे यांचे वागणे लोकांना विचित्र वाटे.

शेवटी पू. बाबा म्हणाले, खरोखर नामाची मस्ती चढली पाहिजे. ह्या बाबतीत गुरु नानकाची गोष्ट लक्षात ठेवण्यासारखी आहे. आग्र्याचा किल्ला बांधण्यासाठी बाबराने वेठबिगार लावले होते त्यात नानकांनाही पकडले होते. ते काम करीत नसत. कडक उन्हाळा असल्यामुळे मजुरांना थंडाई देत तीही पीत नसत. ह्याचे कारण विचारल्यावर ते म्हणाले

भांग तमाखू धत्तुरा उतर जात परभात।
नाम खुमारी नानका चढी रही दिनरात॥

खुमारी शब्दात खरी खुमारी आहे. नामाची अशी मस्ती चढली पाहिजे की बस्स! हे घडावे अशी तळमळ असेल त्याने साधन तर्काच्या कसोटीवर घासू नये; करीत रहावे.

## |१०१| (२० ऑक्टोबर १९८९)

**साधक ख** : आमचे ध्येय निश्चित का होत नाही?

**पू. बाबा** : खरोखरच हा विचार करण्यासारखा प्रश्न आहे. कारण ध्येय निश्चित झाले की ते साध्य करावयाचे साधन कोणते व ते कसे करावयाचे यांचा विचार होऊ शकतो. खरोखरच परमात्मा हवा असे आपल्याला वाटते का? (साधक ब ना) वास्तविक आता आपला संसार झाला. त्यानंतरही आता आपण का जगतो? आपण हा प्रश्न स्वत:ला seriously विचारला पाहिजे.

**साधक ग** : संसार करावयाचा असेही आम्ही मोठे विचारपूर्वक ठरविले नाही. आम्ही प्रवाहाबरोबर वाहत होतो आणि त्याचीच मग ओढ वाटू लागली. दुसरे असे की आत्तापर्यंत गेलेले आयुष्य चांगले गेले असे वाटते. समाधान नाही तरी आत्मसंतुष्टता (complacensy) वाटते.

**साधक ख** : सगळा संसार झाला म्हटले तरी त्यातून बाहेर पडणेही शक्य होत नाही. नातू आजारी पडला की अस्वस्थ वाटते. तो लवकर बरा व्हावा असे वाटते. हे जसे वाटते तसा जप व्हावा असे तळमळीने वाटत नाही.

**साधक प** : संसार आणि नामसाधन यात मूलत:च फरक आहे. संसारात मीपणा वाढवावा लागतो तर नामस्मरणात मी जप करतो हे ही विसरावे लागते.

**साधक ब** : आम्ही आत्तापर्यंत केलेल्या कर्माचा घट्ट दगड बनला आहे. तो साधनाच्या आड येतो. I can feel it.! एखादे दिवशी जप्र चांगला होतो तर एखादे दिवशी अजिबात लक्ष लागत नाही आणि मग लक्षात येते की मी जप करतो म्हणणे व्यर्थ आहे.

**साधक ग** : एखादे दिवशी अगदी शिस्त म्हणून देखील जप झाला नाही आणि त्यामुळे अस्वस्थ वाटू लागले तर थोडी प्रगती आहे असे मानावयाला हरकत नाही.

**पू. बाबा** : हे काही खरे नव्हे. जीव तडफडला पाहिजे.

**साधक क** : मीच मला विसरून जप करावयाचा हे अवघड आहे.

**पू. बाबा** : एकांतात जाऊन साधन जमेल का? निदान आठवड्यातून एक दिवस. तसेच काही काळ मौन पाळावे. श्रीमहाराजांची एकांताची कल्पनाच विलक्षण होती. एकांत मिळत नाही अशी मी तक्रार केल्यावर ते म्हणाले, "रात्रीचे १२ तास नाही का एकांत मिळत? तेव्हां जप करावा." जप बाजूला राहू दे. काही वेळ, पंधरा मिनिटे ते एक तास मन अगदी रिकामे करावे म्हणजे हलके वाटते.

**साधक ग** : जपापेक्षाही हे अवघड आहे.

**पू. बाबा** : असे कसे! हा अभ्यास आहे. तथापि ह्या स्थितीचीही चटक लागायची भीती असते. स्वामी रामदासांनी खरें नामस्मरण केले. These walls will resound with the Name असे ते त्यांच्या मेव्हण्यास म्हणाले. आपणही निराश होण्याचे कारण नाही. But it is high time to do something.

**साधक ख**: आमची शक्ती कमी पडते.

**पू. बाबा** : म्हणूनच आपण शरण जाऊन प्रयत्न केला पाहिजे. त्या प्रयत्नांमुळेच शक्तीचे दार उघडेल व भगवंताची शक्ती प्रवेश करून आपली शक्ती वाढवील. महाराजांच्या ज्ञानाबद्दल सांगतो. एकदा पाणिनीचे एक सूत्र मी त्यांना सांगितले आणि तसेच सूत्र ब्रह्मसूत्रातही आहे म्हणालो, तेव्हां श्रीमहाराज फक्त 'असे का!' येवढेच उद्‌गारले. त्यांच्या त्या उद्‌गारांच्या पद्धतीवरून मला शंका आली म्हणून मी पुन्हा ब्रह्मसूत्रे तपासून पाहिली तेव्हां त्यात ते सूत्र मिळाले नाही.

## |१०२| (२९ नोव्हेंबर १९८९)

मुक्काम हेबळ्ळी.

आज पहाटे काकड आरतीपासून येथील नामसाधन अभ्यास शिबिरास सुरुवात झाली. सुमारे ५०० स्त्री-पुरुष आले आहेत.

पू. बाबा म्हणाले, श्रीब्रह्मानंद महाराजांना श्रीमहाराजांनी जेव्हां कर्नाटकात जाण्याची आज्ञा केली तेव्हां स्वतःच्या पादुका दिल्या. ब्रह्मानंद महाराज त्या रेशमी दोरीत ओवून आपल्या गळ्यात घालत असत; एखाद्या सुवासिनीने मंगळसूत्र जपावे तसे त्या पादुका ते सांभाळत असत. प्रत्येक गुरुपौर्णिमेला

श्रीमहाराज त्यांना एक कफनी देत. तीच कफनी फाटली तरी शिवून ब्रह्मानंद महाराज वापरत.

आज दिवसभर पू. बाबा प्रसन्न आहेत. आज सर्व वेळ त्यांनी श्रीमहाराजांच्या गोष्टी सांगितल्या. श्रीमहाराजांच्या चरित्राच्या प्रकाशनासाठी त्यांनी तीनशे रुपये कर्जाऊ घेतले होते. ते देणे फिटल्यावर त्यांनी तसे श्रीमहाराजांना सांगितले. श्रीमहाराज म्हणाले, एकाला पैसे येण्याची काळजी होती आणि दुसऱ्याला पैसे देण्याची काळजी होती. अंतकाळी ही काळजी करणारांपैकी कोण तरेल? एकूण पैशाच्या विचारात गेलेला काळ वाया जातो.

श्री. रामकृष्णपंत दामले सहा वर्षांचे असताना त्यांना श्रीमहाराजांनी एक रुपया घेऊन ये म्हणून सांगितले व नंतर आपण होऊन अनुग्रह दिला. शेवटी ते खूप आजारी असतांना पेटीवर रोज संध्याकाळी श्रीमहाराज त्यांची आठवण काढीत व त्यांच्या प्रकृतीची चौकशी करीत. पू. बाबांनी श्रीमहाराजांना विचारले की तुम्ही दामल्यांची इतकी आठवण का काढता? तेव्हां श्रीमहाराज म्हणाले, तो माझे सतत स्मरण करतो म्हणून मला त्याची आठवण होते.

## |१०३| (३० ऑक्टोबर १९८९)

मुक्काम हेबळ्ळी.

हुबळीचे श्री. तबीब एकदा श्रीब्रह्मानंद महाराजांना म्हणाले की आपण इतके नाम कसे घेतले त्याबद्दल काही सांगा. ब्रह्मानंद महाराज म्हणाले की ते श्रीमहाराजांना विचारावे. पुढे श्रीमहाराज हुबळीला गेले होते तेव्हां श्री. तबीब यांनी हाच प्रश्न श्रीमहाराजांना विचारला. प्रथम श्रीमहाराज म्हणाले की ते ब्रह्मानंद बोवांना विचारावे. पण त्यांनीच तुम्हाला विचारावयाला सांगितले आहे असे म्हटल्यावर नंतर सांगतो म्हणाले.

दुसऱ्या दिवशी आसपास विशेष कोणी नाही असे पाहून श्रीमहाराज तबीबांना म्हणाले की खरें नाम घेण्यासाठी तुला मरावे लागेल; तेव्हां ह्या भानगडीत पडू नये. तथापि मी सांगितले आहे तेवढे करावे, मग राम काय करायचे ते करील.

## |१०४| (३१ ऑक्टोबर १९८९)

मुक्काम हेबळ्ळी.

आज शिबिराचा तिसरा आणि शेवटचा दिवस.

पू. बाबा प्रवचनात म्हणाले की आपण प्रपंचातल्या संकटांना फार महत्व देतो आणि भगवंताला विसरतो हे बरोबर नाही. प्रवासात चप्पल तुटली तर कोणी प्रवास थांबवत नाही.

श्रीमहाराजांनी मला एकदा विचारले की नाम कसे चालले आहे? थोडे चालू आहे असे मी म्हणालो. महाराजांनी कारण विचारल्यावर मी म्हणालो की पगार फार कमी आहे त्यामुळे विवंचना वाटते. तेव्हां श्रीमहाराज म्हणाले की ह्यापेक्षा जास्त गरिबी शक्य नाही अशा दारिद्र्यात मी बारा वर्षे काढली तरी माझे नाम टिकले, मग तुम्ही तर माझ्यापेक्षा श्रीमंत आहात! अर्थातच मी निरुत्तर झालो. श्रीमहाराज म्हणत, पैसा नसला तर अडते आणि असला तर नडते म्हणून पैशाची विवंचना बाजूस ठेवून नाम घेतले पाहिजे.

एकदा श्रीमहाराज एका गृहस्थांना काही सांगत होते; अर्थात नामासंबंधीच. त्या गृहस्थांचे मात्र त्यांच्या सांगण्याकडे लक्ष नव्हते. मी हे पाहिले होते म्हणून ते गृहस्थ गेल्यावर मी श्रीमहाराजांना म्हणालो की कशाला आपण त्यांना काही सांगता? तेव्हां श्रीमहाराज म्हणाले की मी उगीच काही सांगत नाही. मी सांगतो ते खोल जाईल व आत्ता जरी नाही तरी अंतकाळी त्यांना ते आठवेल व वाटेल की त्यांनी (श्रीमहाराजांनी) सांगितले पण मी केले नाही, आणि असे जरी झाले तरी त्यांना चांगली गती मिळेल.

श्रीमहाराजांना विचारले की आपण 'दीनदास' नांव कां घेतले? ते म्हणाले की प्रापंचिक लोक खरे दीन असतात. त्यांची सेवा करावयाची म्हणून मी हे नांव घेतले.

पू. बाबांनी अनुसंधानाच्या संदर्भात आज संध्याकाळी एक हकिगत सांगितली. श्री. आण्णासाहेब घाणेकरांना अर्धांग झाले होते. श्रीमहाराज पू. बाबांना त्यांच्याकडे घेऊन गेले. श्रीमहाराजांनी आण्णासाहेबांना नाम चालू आहे ना असे विचारले. त्यावर आपल्या हृदयाकडे बोट दाखवून ते म्हणाले, 'ऐथे ऐथे चालू आहे'. त्यांची अवस्था पाहून श्रीमहाराज म्हणाले, माझ्या गळसरीतला एकेक मोती गळून पडत आहे; तथापि त्यांची अवस्था दाखवायला आज तुम्हाला घेऊन आलो.

एकदा श्रीमहाराज मला म्हणाले की मी एकदा एखाद्या माणसाला आपला म्हटले की त्याला शेवटपर्यंत सोडत नाही. त्यावर पू. बाबांनी विचारले की 'आपला' म्हणजे काय? तेव्हां श्रीमहाराज म्हणाले की माणसाची जातगोत

काहीही असो, जो नाम घेतो त्याला मी आपला म्हणतो आणि ज्याला मी अनुग्रह देतो तो तर माझाच असतो.

### |१०५| (१ नोव्हेंबर १९८९)

मुक्काम हेबळ्ळी. संध्याकाळी पू. बाबांच्या खोलीत.

**पू. बाबा** : फार पूर्वी एकदा मी श्रीमहाराजांना सांगितले की मी फार लांब कुलाब्याला राहतो. तेव्हा आपले लक्ष असू द्या. तेव्हा श्रीमहाराज म्हणाले, माझ्या गुरूंनी मला तीन गोष्टी दिल्या आहेत.

१) मला पाहिजे तेथे हवे तेव्हां जाता येते.

२) दुसऱ्याचा अंतकाळ साधता येतो. आणि

३) नामाची गोडी देता येते.

**साधक ब** : हा आम्हाला मोठाच दिलासा आहे. श्रीमहाराजांनी आम्हाला नामाची गोडी द्यावी.

**पू. बाबा** : ती अवस्था झेपण्यासाठी तयारी व्हावी लागते. ती तयारी हळूहळू होईल. त्यासाठी श्रीमहाराजांची प्रार्थना करावी.

उद्या बरीच मंडळी वेंकटापूर, बेलधडीला जाणार आहेत. पू. बाबा मात्र येथेच राहणार आहेत. वेंकटापूर येथील श्रीव्यंकटेशाच्या मूर्तीबद्दल पू. बाबा म्हणाले, दृश्यात (material cause) उपादान कारण आणि (efficient cause) निमित्त कारण ही भिन्न असतात. उदाहरणार्थ, माती व कुंभार किंवा दगड व शिल्पकार. पण वेंकटापूरची मूर्ती मात्र दगडातून हळूहळू आपोआप बाहेर उमटत आहे. केवळ भगवंताच्या बाबतीतच उपादान कारण आणि निमित्त कारण एकच असतात. उद्या तुम्ही सर्वजण तेथे जाणार आहात तेव्हा श्रीव्यंकटेशाजवळ काय मागावे असे वाटते ते मागून घ्या. ही मूर्ती म्हणजे श्रीब्रह्मानंद महाराजांच्या तपश्चर्येचे फळ आहे. तेथे परमात्मा जागृत आहे. तो मागितलेले लवकर देतो.

श्रीमहाराजांनी वेंकटापूरबद्दल असे सांगितले आहे की एकवेळ काशीला जायचे राहिले तरी चालेल पण एकदा तरी वेंकटापूरला जाऊन यावे. १९१० साली देहात असताना श्रीमहाराज वेंकटापूरला गेले होते तेव्हां म्हणाले होते की मी आता येथेच राहतो. पुढे पू. तात्यासाहेब वेंकटापूरला गेले असतांना पेटीवर श्रीमहाराज पुन्हा मी आता येथेच राहतो म्हणाले.

तिसरा प्रसंग रामेश्वरला असाच घडला. त्यावेळी श्री. गणपतराव दामले म्हणाले की आम्ही काय केले असता तुम्ही आमच्याबरोबर राहाल? त्यावर श्रीमहाराज म्हणाले, पाणी आणा. पाणी आणल्यावर म्हणाले, संकल्प सोडा की मी माझा प्रपंच तुम्हाला दिला. त्याप्रमाणे केल्यावर ते परत आले.

## |१०६| (३ नोव्हेंबर १९८९)

मुक्काम हेबळ्ळी. संध्याकाळी पू. बाबांची खोली.

**पू. बाबा** : आपण नाम टिकविण्याचा अभ्यासच केला पाहिजे. मी काय होतो आणि आता कसा झालो आहे. (ती सौ. आईकडे पाहून) ह्यांना विचारा. एकदा खूप राग आला तेव्हां घरातल्या सगळ्या कपबशा फोडल्या होत्या. श्रीमहाराजांच्या सहवासामुळे आता शांत झालो आहे. म्हातारपण कठीण आहे पण नामस्मरणाची सवय केल्यास ते सोपे जाईल. आज सकाळी फोटो काढण्याचा कार्यक्रम झाला तेव्हां कितीजणांचे नामस्मरण चालू होते. (सर्वांचे नाही हेच उत्तर असल्याने कोणीच बोलले नाही) असे कां व्हावे? फोटो काढणाऱ्याचे नाम राहिले तर मी एकवेळ समजू शकतो. पण तुम्हाला फोटोला उभे रहाण्यापलीकडे काय काम होते? मग नाम कां झाले नाही? माझे तर नाम चालले होते. तुम्ही करीत नाही, पण अभ्यासाने हे शक्य आहे. इथले वातावरण चांगले आहे. माझे समाधीवर नाम कसे छान जमले, लय लागला. गर्दी नसेल तेव्हां निदान आठ दिवस तुम्ही सर्वजण येथे केवळ नामस्मरण करण्यासाठी या.

आपले बोलणे, वागणे सर्व काही असे असावे की आपली गोड स्मृती रहावी. एकदा मनात विचार आला की श्रीमहाराजांची आठवण इतकी वरचेवर का होते? तेव्हां आढळून आले की त्यांच्या संदर्भात फक्त गोड स्मृतीच आहेत.

एकदा श्रीमहाराजांनी विचारले की तुम्ही दान करता का? मी नाही म्हणालो. तेव्हां श्रीमहाराज म्हणाले की दान करीत जावे आणि दान देतांना आनंद व्हावा. तेरा कोटी जप पूर्ण झाल्यावर पू. तात्यासाहेबांना दान देण्याची इच्छा झाली. त्यावेळी गोंदवल्यास पुष्कळ ब्राह्मणांना दान दिले. श्रीमहाराजांच्या कृपेने कोणालाही शंभर रुपयांच्या खाली दिले नाही असे ते म्हणाले. त्यांचे पूर्ण समाधान झाले. वास्तविक श्रीमहाराजांपुढे आलेले पैसेच त्यांनी दान केले होते! श्रीमहाराजांचे म्हणणे असे की दान दिल्याने आपले कमी होत नाही. आपल्या प्रारब्धात असेल तितके आपल्याला मिळतेच.

एकदा सौ. ताईंना खोकला झाला होता. त्यांचे जावई डॉ. काळे त्यावेळी रावळगांवला होते. ते म्हणाले की तिकडे या म्हणजे मी औषध देऊन खोकला बरा करीन; म्हणून त्या रावळगांवला निघाल्या. जाण्यापूर्वी श्रीमहाराजांना नमस्कार केल्यावर त्यांनी विचारले, प्रारब्ध येथे ठेवून जाणार आहात कां? पुढे त्या रावळगांवला गेल्या पण तेथे औषध घेऊनही खोकला बरा झाला नाही.

श्री. भालचंद्रशास्त्री उप्पिनबेटगिरी माझ्याजवळ श्रीमहाराजांसंबंधी बोलतांना म्हणाले की असे प्रसन्न व्यक्तिमत्व मी कोठेही पाहिले नाही. पू. तात्यासाहेब केतकरही पुढे पुढे अतिशय प्रसन्न असत व वागत. श्री. भाऊसाहेबांचे कपडे एकदा चोरीला गेले. त्यांना सांगितल्यावर ते म्हणाले, असू दे. चोराला त्यांची अधिक गरज असेल. श्री. भाऊसाहेबांचे हे बोलणे श्रीमहाराजांना सांगितल्यावर ते म्हणाले की मला असे वागणे आवडते.

एकदा श्रीमहाराजांना म्हणालो की तुकारामांनी पांडुरंगाचे सुंदर ते ध्यान म्हणून वर्णन केले आहे पण आम्हाला तर ती दगडाची ओबडधोबड मूर्ती दिसते. तेव्हां श्रीमहाराज चटकन म्हणाले की तुमच्या हृदयात दगड आहे म्हणून तुम्हाला तो दगड दिसतो!

चर्चेत प्रश्न निघाला की नको असलेला माणूस आला (ज्याच्यामुळे साधनात व्यत्यय येतो) तर कसे वागावे?

**पू. बाबा** : श्रीमहाराजांच्या इच्छेने हा आला आहे हे लक्षात ठेवून त्याच्याशी गोड वागावे. अर्थात हे कठीण आहे पण अभ्यास केला पाहिजे. सर्वांभूती भगवद्‌भाव पहाण्याचा अभ्यास वाढवला पाहिजे. तथापि हे कायम जमेलच असे नाही. साधक कसा पाहिजे ह्या संदर्भात बोलतांना श्रीमहाराज म्हणाले की खेडेगावात मराठा बायका डोकीवर पदर घेऊन वावरतात व मर्यादेने वागतात. पण डोक्यावरून पदर काढलेल्या बाईला बारा वाटा मोकळ्या असतात. तसा साधकाला कधीतरी डोकीवरचा पदर काढावाच लागतो आणि लोकलज्जा सोडून साधन करावे लागते. सर्वकाळ सर्वांना सांभाळणे कठीण आहे. थोडेबहुत पुढे मागे होणारच. खुबीने वागावे. शक्यतो दुसऱ्याचे अंत:करण दुखवू नये. पण ते वागणे साधनाच्या आड येत असेल तर प्रथम साधन सांभाळावे.

**|१०७|** (१० नोव्हेंबर १९८९)

मालाडला पू. बाबांच्या घरी.

**पू. बाबा** : श्रीमहाराजांच्या येथे नियमित येणाऱ्या भक्ताला श्रीमहाराज म्हणाले की सर्व संसार सुस्थितीत असणे देखील चांगले नाही. ते गोड विषासारखे आहे. त्या गृहस्थांना हे सांगणे रुचले नव्हते. खरोखर सत्य व प्रिय सांगणे अवघड आहे.

दुसरी एक सुमारे ४०-४५ वर्षांपूर्वीची हकिगत. बडोद्याचे एक गृहस्थ मुंबईला मेकॅनॉन मेकॅन्झीत नोकरीला होते. बोरीवलीस रहात. पुढे मालाडला राहायला आले. येथे ते श्रीमहाराजांकडे येत असत. पुढे ते आजारी पडले तेव्हां श्रीमहाराज त्यांच्या घरी जाऊन त्यांना भेटून आले. मीही त्यांच्याबरोबर गेलो होतो. पुढे त्यांचा आजार वाढला आणि त्यातच त्यांचा अंत झाला. त्यावेळी मी त्यांच्याजवळ होतो. तेथून परत आल्यावर श्रीमहाराजांनी मला विचारले की अंतकाळी त्यांना रामाचे तीर्थ घातले ना? मी म्हणालो, तीर्थ कसले घालता? त्यांचे प्राण केव्हांच गेले होते! तेव्हां श्रीमहाराज म्हणाले, तुम्हा लोकांची श्रद्धा नाही; तीर्थ आपले काम करतेच. आत्तादेखील त्यांचा सूक्ष्म देह स्मशानात त्यांच्या स्थूल देहाभोवती घिरट्या घालतो आहे. आपण श्रद्धेत किती कमी पडतो ते ह्या प्रसंगावरून लक्षात आले.

हेबळ्ळीस साधक प यांनी पू. बाबांना प्रश्न विचारला होता की नामात माझे हित आहे हे मला कळते. नाम हेच सर्वस्व कसे आहे हे मी इतरांना पटवून देऊ शकतो आणि तरीदेखील माझे नामस्मरण कां होत नाही? खरोखर ही सर्वांचीच अडचण आहे. यावर विचार करू असे त्यावेळी पू. बाबा म्हणाले होते त्याचा उल्लेख करून पू. बाबा म्हणाले की मी यावर विचार केला. शंकराचार्य म्हणतात त्याप्रमाणे हा अविद्येचा जोर आहे. आपण निश्चय करून परिश्रमपूर्वक नाम घेत राहू तसा तो जोर कमी होईल, मीपणा क्षीण होईल आणि नामस्मरण वाढेल. याकरता दृढ श्रद्धा पाहिजे.

**साधक ग** : आमची मोठी विचित्र स्थिती आहे. श्रद्धा नाही असे नाही पण ती दृढही होत नाही. बरे, श्रद्धा बाजूला ठेवून विचाराने आत्मज्ञान करून घ्यावे तर त्यासाठी लागणारी विचारांची तीव्रता आणि धारणा आमच्यापाशी नाही.

**पू. बाबा** : हे खरें आहे.

**साधक ख** : नाम आणि श्रीमहाराज एकच आहेत. तेव्हां नाम हे आज सर्वोच्च मूल्य नसले तरी प्रधान मूल्य झाले पाहिजे. तरच नाम वाढेल.

**साधक क** : नाम घेतांना माझे मन विषयांकडे जाते याचे कारण मला त्यात आनंद वाटतो. माणूस आनंदाशिवाय जगू शकत नाही. जसजसा नामात

रस येऊ लागेल तसतशी विषयांची गोडी कमी होईल. नाम घेणाऱ्याला साहाय्य करणे हा भगवंताचा स्वभाव आहे. विनयपत्रिकेत तुलसीदास म्हणतात की मी कसाही असलो तरी उद्धार करणे हा तुझा सहज स्वभाव आहे.

मला प्रश्न पडतो की विषयांचा भोग कोण घेतो; कारण आत्मा तर निर्लिप्त आहे.

**पू. बाबा** : हा भोग जीव घेतो. मुण्डकोपनिषदातील एका झाडावरील दोन पक्ष्यांचे उदाहरण तुम्हाला माहीतच आहे.

अजून हेबळ्ळीची आठवण होते. तेथे शांत वाटले. तुम्ही परत तेथे जपासाठी अवश्य जा.

## |१०८| (१७ नोव्हेंबर १९८९)

**पू. बाबा** : पूर्वी विचारवंत विश्वाचा जो Mechanistic view घेत असत तो आता बदलू लागला आहे. शास्त्रज्ञही म्हणू लागले आहेत की ह्या विश्वाला मन असले पाहिजे; कोणी शास्ता असला पाहिजे. बहुतेक पाश्चात्य तत्त्वज्ञ आणि शास्त्रज्ञ देवाची कल्पना मान्य करतात.

**साधक प** : त्यांची देवाची कल्पना भारतीयांपेक्षा थोडी वेगळी आहे. रोजच्या व्यवहारात त्यांना देवाची आवश्यकता वाटत नाही; तेथे भौतिक शास्त्रेच उपयोगी पडतील असे त्यांना वाटते. ह्याच्याउलट आपल्या तत्त्वज्ञानात सर्व काही ईश्वराच्याच सत्तेने होते हे ज्ञान होते. पाश्चात्यांचा देव तर्कावर आधारलेला आहे.

**पू. बाबा** : हे खरें आहे. आपण जे ज्ञान म्हणून साठवतो त्याने देव जाणता येणार नाही. आपले ज्ञान आत्मकेंद्रित असते आणि आत्मज्ञान होण्यास अहं नाहीसा झाला पाहिजे. श्रीमहाराज म्हणत अहंकार वाईट का, तर तो माणसाला संकुचित करतो आणि परमात्मा तर व्यापक आहे. संकुचित राहून व्यापकाचे ज्ञान होणार नाही.

आपण असे कां समजू नये की जग ही एक प्रयोगशाळा आहे आणि भगवंत माझ्यावर प्रयोग करतो आहे. असे वाटले तर स्वस्थता नाही का येणार ?

**साधक ग** : पण त्यासाठी तो माझे हित करणारा आहे हा भाव दृढ झाला पाहिजे.

**पू. बाबा** : अहं सोडून नाम घेणे म्हणजे surrender शरणागतीच आहे. अहंरहित होऊन जो साधन करतो त्याला जीवनाविषयी काय वाटेल?

**साधक ग** : एकदा राम कर्ता हा निश्चय झाल्यावर तो होणाऱ्या घटनांकडे साक्षीभावाने पाहील. जे जे काही घडते ते परमात्माच करतो हे पटले तर कामच झाले!

**साधक प**: सर्व काही तो करतो म्हटले की मी नाहीसा झाला. मग तो जे करतो ते हिताचे की अहिताचे ह्याचा विचार कोणी करायचा? एकदा अहं नाहीसा झाला की हित किंवा अहित कोणाचे? मी नाहीसा झाला की तोच उरतो. मग द्वैत रहातच नाही.

**पू. बाबा** : हे खरें आहे. गीतेत सहाव्या अध्यायात भगवंत सांगतात, "आत्मौपम्येन सर्वत्र समं पश्यति योऽर्जुन। सुखं वा यदि वा दुःखं स योगी परमो मतः॥" समत्व हा परम योग, श्रेष्ठ योग आहे. समत्व आले की जीवनातील द्वैत आणि भीती नाहीशी होतात. नामस्मरण करतांना आपण परिस्थितीवर फार अवलंबून राहतो. म्हणूनच सत्संगाची आवश्यकता आहे.

**साधक ग** : सद्ग्रंथांचे उदाहरणार्थ नाथ भागवत - वाचन करून नामस्मरणाला बसलो तर थोडे चांगले लक्ष लागते.

**साधक क** : ह्यासाठी सगुणोपासनेचा चांगला उपयोग होतो.

**साधक ज** : हृदयातील ज्योतीवर चित्त एकाग्र करायला काय हरकत आहे?

**पू. बाबा** : ज्योतीऐवजी श्रीरामाची किंवा श्रीमहाराजांची सतेज मूर्ती कल्पावी. हे ध्यान करतांना ताटस्थ्य-शून्यावस्था येत नाही ना हे पाहिले पाहिजे. श्रीमहाराजांच्या विचारांपेक्षाही त्यांच्या जीवनातील घटनांचे चिंतन केले तर त्याचा नामस्मरणास चांगला उपयोग होतो. आपण जणू काही ते प्रसंग पुन्हा जगतो. (In fact, we relive those incidents)

पू. बाबा पुढे म्हणाले, आपले अनुसंधान टिकत नाही कारण आपले ध्येय ठरलेले नाही. नामाचा खरेंपणा जाणवत नाही. डॉक्टरांनी कॅन्सर आहे म्हटले तर खरें वाटते परंतु सद्गुरु फक्त नामच सत्य आहे असे सांगतात ते खरें वाटत नाही. प्रपंच, जग हे खरोखर passing show सारखे आहे; त्यात खरें काहीच नाही. श्रीमहाराज म्हणाले की आगगाडीतून जातांना झाडे, वनश्री, वैराण प्रदेश इत्यादी जोरात मागे पळतांना दिसतात. आपल्या जीवनातील

घटना देखील तशाच असतात. एकदा मागे पडल्या की पुढे फक्त स्मृती शिल्लक रहातात. नाम हे आगगाडीसारखे आहे. जो नामात राहील तो पुढे जाईल.

अनुसंधान ठेवण्यास मन रिकामे ठेवावे किंवा संतचरित्रातील गोष्टींचे चिंतन करून मन त्यांनी भरून टाकावे. रिकाम्या मनात प्रसन्नता रहात असेल तर ते करायला हरकत नाही. पण सर्वसामान्यपणे आपल्या गुरूच्या चरित्रातील प्रसंगांचे कल्पनेने स्मरण केले तर त्याचा आतील इंद्रियांशी स्पर्श होऊन अनुसंधान चांगले टिकेल.

**|१०९|** (२४ नोव्हेंबर १९८९)

**पू. बाबा** : गेल्या सहा हजार वर्षांच्या ज्ञात इतिहासात अनेक युद्धे झाली. तेव्हा युद्ध हा मानवी जीवनातील अटळ भाग दिसतो. तथापि युद्धे टळावी म्हणून संत सत्पुरुष आपआपल्या परीने प्रयत्न करीत असतात.

गेल्या आठवड्यात पू. बाबांना भेटावयास आलेल्या मूळ गोव्यातील एका ख्रिश्चन बाईंची हकिगत पू. बाबांनी सांगितली. आजारात चुकीचे औषध दिले गेल्यामुळे डीसेंट्रीचा त्रास त्यांच्या कायम मागे लागला आहे. आवाज चांगला म्हणून त्या एका प्रख्यात गायिकेकडे गेल्या. त्यांनी गाण्याचा अभ्यास करावयास सांगितले. एक ब्राह्मण गवई शिकवीत असत. त्यांनी 'अनाहत नाद अपरंपार' ही चीज शिकवली. त्याचा अर्थ बाईंनी विचारला आणि अनाहत नाद कसा असतो ह्याबद्दल त्यांच्या मनात जिज्ञासा निर्माण झाली. त्यावर चिंतन सुरू झाले आणि एक दिवस बेंबीपासून सूर येतात असे त्यांना जाणवले. पुढे रियाझ करतांना गळ्यातून सूर आला नाही तरी आत स्वराचे स्पंदन जाणवून आनंद वाटू लागला. ह्यातूनच वैराग्य आले आणि ज्ञानेश्वरीचा अभ्यास सुरू केला. त्या म्हणतात की त्यांना ज्ञानेश्वरीच्या शब्दांचा सुगंध येतो. पू. बाबांचे 'नामसाधना' पुस्तक वाचून त्या त्यांना भेटायला आल्या होत्या!

ही हकिगत सांगून पू. बाबा म्हणाले की विचार केल्यावर मला वाटू लागले आहे की आपल्या साधनाच्या आड 'मी' म्हणजे अहंकार येतो. हा 'मी' नाहीसा झाला पाहिजे.

**साधक क** : हा 'मी' मोठा लबाड आहे. आपल्या साधनात तो अनेक मायावी रूपे, 'शंका' निर्माण करतो. मी प्रापंचिक जबाबदारी सांभाळली

पाहिजे हे देखील तोच सांगतो. साधन वाढले तर त्यात आपला नाश होण्याची त्याला भीती वाटते.

**साधक ड** : श्रीमहाराजांनी सांगितले आहे की तुम्ही नाम घेऊ लागला की विकारांना घर खाली करावयाची नोटीस मिळते.

**साधक ख** : विकारांना ते सहन होत नाही आणि ते बंड करून उठतात. त्यांचे बंड अनेक प्रकारांनी व्यक्त होते.

**पू. बाबा** : साधनातला 'मी' नाहीसा करायला मोठे धैर्य लागते आणि ते धैर्य दाखवले तर कृपा होते हा अनुभव आहे.

. आपली वाचनाची हौस गेली पाहिजे. याबाबतीत आपण ब्रह्मानंद महाराजांचा आदर्श समोर ठेवला पाहिजे. आपली सध्याची बुद्धी ही देहबुद्धी असल्यामुळे ती नकळत आपला घात करते आणि काहीतरी कारणे दाखवून नामात अडथळे निर्माण करते. तेव्हां भगवंताचे स्मरण झाल्यास ते बरोबर आहे व काहीही कारणाने विस्मरण झाल्यास देहबुद्धी आड येते असे समजावे कारण ही देहबुद्धीच आपल्याला फसवत असते.

**|११०|** (१ डिसेंबर १९८९)

**पू. बाबा** : पाचलेगावकर महाराज एकदा श्रीमहाराजांना (पेटीवर) भेटले होते. पू. तात्यासाहेबांच्या गळ्यात त्यांनी साप घातलेला एक फोटो आहे. श्रीमहाराजांनी त्यांना विचारले, साधन चालू आहे ना? ते होय म्हणाले. श्रीमहाराजांनी त्यांना सांगितले की तुम्ही चालवलेले धर्मजागरणाचे कार्य चांगले आहे; पण ज्या दिवशी त्यात गुंतल्यामुळे साधन होत नाही असे दिसेल त्या दिवशी या सर्वावर लाथ मारून निघून जा.

पाचलेगावकर आणि मी हैदराबादला बरोबर होतो. मला येथे श्रीमहाराजांबरोबर पाहून ते म्हणाले "हा येथे आहे वाटते." तेव्हां श्रीमहाराज म्हणाले, "लोक यांना विद्वान म्हणून ओळखतात. मी मात्र साधक म्हणून ओळखतो. पुढे एकदा श्रीमहाराज ह्यांना (ती. आईंना) म्हणाले की प्रौढ वयात मुलगा झाला तर त्याचे शिक्षण होऊन तो केव्हां हाताशी येईल याची बाप वाट पहातो तसा मी ह्यांच्याकडे पहातो.

डॉ. पाथरकर वाडीया हॉस्पिटलमधे नोकरीला होते. ट्रस्टींनी त्यांचा पगार एकदम तीनशे रुपयांनी वाढवला. ट्रस्टींपैकी एक श्री. नेस वाडीया यांनी त्यांना विचारले, 'Are you now satisfied.?' डॉ. पाथरकरांनी उत्तर

दिले, I was never dissatisfied.' वाडीयांना हे उत्तर ऐकून फार आश्चर्य वाटले. पुढे एकदा डॉक्टरांनी पगार वाढल्याचे श्रीमहाराजांच्या कानावर घातले. तेव्हां श्रीमहाराजांनी विचारले, 'विष्ठा कोणत्या रंगाची चांगली?' खरोखर संत पैशाकडे विष्ठेप्रमाणे पहातात. तो मिळाला - जास्त मिळाला म्हणून आनंद होणे म्हणजे भगवंतापासून दूर जाणेच होय.

एकदा मी श्रीमहाराजांना विचारले की खाण्याबाबतचे प्रयोग करू का? श्रीमहाराज म्हणाले, 'त्यापेक्षा अनुसंधान कसे टिकेल याचे प्रयोग करावे.' एकदा पू. तात्यासाहेबांना कोणीतरी विचारले की आपण (पेटीवर) इतके काय सांगता? ते म्हणाले केशवरावांना विचारा. मला विचारल्यावर मी म्हणालो की हा प्रश्न श्रीमहाराजांनाच विचारू. हा प्रश्न श्रीमहाराजांना विचारल्यावर ते म्हणाले की एक वैद्य होता. तो त्याच्याकडे येणाऱ्या रोग्यांना औषध देत असे. कोणाला दुधातून, कोणाला तुपातून, कोणाला मधातून औषध घ्यायला सांगत असे. एकदा त्याचा मुलगा आजारी पडला. तेव्हां त्याने त्याला फक्त एक चिमूट औषधी भस्म दिले आणि तेवढ्याने मुलगा बरा झाला. तसे मी इतर सर्वांना नामस्मरण करा, अखंड जप करा इत्यादी सांगतो. पण अगदी माझे असे जे आहेत त्यांना फक्त अनुसंधान ठेवा म्हणून सांगतो. हे सांगून पू. बाबा म्हणाले, अनुसंधान हे सर्व साधनाचे मर्म आहे. आपण त्याने झपाटून गेले पाहिजे. देहाचा विसर पडला पाहिजे.

**साधक प** : नुसता देहाचा विसर पडून उपयोगी नाही. त्याचबरोबर शरणागती आली पाहिजे.

**पू. बाबा** : आपण परिस्थितीला सहज शरण जातो. नामस्मरणाला स्नानादी उपाधि लावतो. त्यावर मात केली पाहिजे. कोठेही, केव्हाही नामाची चटक लागली पाहिजे. हा बदल का होत नाही?

**साधक प** : सूक्ष्मातील बदल हा दृश्यातील बदलापेक्षा वेगळा आहे. दृश्यातील बदल देखील हळूहळू झाला तर लक्षात येत नाही. उदाहरणार्थ, लहान मुलाच्या शरीराची रोज वाढ होते पण काही दिवस गेले की मुलाची उंची वाढल्याचे लक्षात येते. सूक्ष्मात देखील पाच वर्षांपूर्वी आपण कसे होतो व आज कसे आहोत याची तुलना केली तर बदल होतो याची खात्री पटते. आपला पुनर्जन्मावर खरा विश्वास नाही. त्यामुळे ह्या जन्मातच सर्व काही झाले पाहिजे असे वाटते. पण अनेक जन्मात सद्गुरु हळूहळू बदल घडवून

आणतात. एकदम बदल झाला तर तो आम्हाला सहन होणार नाही. क्रमयोगच खरा आहे.

साधक क ह्यांनी निसर्गदत्त महाराजांची एक गोष्ट सांगितली. ते म्हणाले, सिनेमा पहातांना तो आवडला नाही तर आपण उठून जातो तसे जीवनातील घटनांकडे सिनेमातील प्रसंगांइतके अलिप्तपणे पाहिले तर घटना दु:खद वाटली तर आपण तिच्यापासून वेगळे होऊ शकू; त्यातून उठून जाऊ. पुन्हा म्हणाले, स्वप्न पडलेल्या माणसाने चांगले स्वप्न पडू दे म्हणावे तसे तुम्ही करता. मी तर तुम्हाला जागे करण्याचा प्रयत्न करतो.

चर्चेत विषय निघाला की संसारात दु:खे आली तरच भगवंताकडे लक्ष लागते का? साधक क आणि प यांचे म्हणणे असे की आहे त्या परिस्थितीत सद्‌गुरु आपल्याला भगवंताकडे वळविण्याचा प्रयत्न करतात. तथापि आपण पुरेसे वळत नाही असे वाटले तर सूक्ष्मात झटका देतात कारण सूक्ष्मामध्ये स्थूलासारखी हिंसा (violence) नाही.

**पू. बाबा** : सद्‌गुरु काही वेळा स्थूलातही दंड करतात. उदाहरणार्थ, तुकाराम.

नंतर साधक क यांनी एकनाथ महाराजांच्या भावार्थ रामायणातील वालीवधाचा प्रसंग सांगितला. श्रीरामांनी आपण वालीला का मारले हे सांगितल्यावर वाली म्हणाला, श्रीरामा, तुझ्या हातून मरण येत आहे हे खरोखर माझे भाग्य आहे. इतर योध्यांचे बाण फक्त स्थूल शरीराचा नाश करतात तर रामबाण स्थूल, सूक्ष्म व कारण या तीन्ही देहांचा नाश करून मुक्ती देतात.

पू. बाबांनी भावार्थ रामायणातील दुसऱ्या प्रसंगाचे - रामराज्याभिषेक ठरल्यानंतर सुमंत श्रीरामाच्या महालात जातो तेव्हां सात दारे आणि उंबरठे ओलांडून कसा गेला याचे वर्णन केले. (भावार्थरामायण अयोध्याकाण्ड पाचवा प्रसंग ओव्या ४८ ते ५३)

**साधक प** : तुलसीदासांनी देखील रामचरितमानसात प्रत्येक प्रसंगात श्रीरामाच्या आतल्या स्थितीचे फार चांगले वर्णन केले आहे. योगवासिष्ठातही पूर्वीच्या अनेक जन्मांची माहिती देऊन कथेचा पूर्वापर संबंध दाखवला आहे.

पू. बाबांनी एक जुनी हकिगत सांगितली. एक दिवस श्रीमहाराजांकडे पुष्कळ माणसे आली. त्यामध्ये पू. बाबांचा पुष्कळ वेळ गेला. दुसरे दिवशी एम्.ए.चे लेक्चर घ्यायचे होते. शंकराचार्यांच्या मिथ्यावादाबद्दल सांगायचे होते. सर्व मंडळी गेल्यावर त्यांनी श्रीमहाराजांना विचारले की उद्या काय

सांगू? मी काय सांगणार असे प्रथम श्रीमहाराज म्हणाले. मग म्हणाले तीन उदाहरणे सांगावी. १) रात्री उशीरा नाटक पाहून एक माणूस घरी आला. त्याच्या घरासमोर झाड होते. अंधारात ते झाड न दिसता कोणीतरी माणूस उभा आहे असे त्याला वाटले. २) ढगांकडे पहात बसले असता कल्पना करावी तसे ढगांचे वेगवेगळे आकार दिसतात. ३) स्वप्न पडते तेव्हा ते सत्यच असते. जागे झाल्यावर ते स्वप्न होते हे समजते. श्रीमहाराजांनी नेहमीचा रज्जूसर्पाचा विवर्त सांगितला नाही. दुसरे दिवशी व्याख्यानात ही तीन्ही उदाहरणे सांगितली आणि व्याख्यानानंतर आम्हांला मिथ्यावाद चांगला समजला असे विद्यार्थ्यांनी सांगितले.

**पू. बाबा** : एकदा श्रीमहाराजांबरोबर जालन्याला जायचे ठरत होते. माझी तब्येत बरी नव्हती म्हणून मी श्रीमहाराजांना म्हणालो की माझ्या मनात यायचे नाही. श्रीमहाराज म्हणाले, पण माझ्या मनात आहे ना! मग काही न बोलता त्यांच्याबरोबर गेलो. ज्याची साधन करण्याची इच्छा आहे त्याच्या आड प्रपंच येत नाही. श्रीमहाराज म्हणाले, दोन खोल्यात प्रपंच होतो मग परमार्थ का होत नाही?

पू. बाबा म्हणाले, आपण नामाला विनाकारण उपाधि जोडतो. आपली सध्याची मनाची फ्रेम (चौकट) बदलायला दोन्हीं पैकी एक गोष्ट करावी. १) प्रारब्धाने जे व्हावयाचे असेल ते होणारच म्हणून स्वस्थ रहावे. किंवा २) सर्व काही श्रीसद्गुरूंच्या इच्छेने आपल्या चांगल्याकरता होते असा दृढ भाव ठेवावा. खरे तर आपल्याला भगवंताच्या किंवा सद्गुरूंच्या सर्वशक्तिमत्वाची कल्पनाच नाही.

पू. बाबा म्हणाले, एकदा गोंदवल्याला जाताना रात्री ३ वाजता गाडी कोरेगावला पोचली आणि पुढची बस सकाळी १०॥ वाजता मिळाली. गोंदवल्यास पोचल्यावर पू. तात्यासाहेब पेटीवर बसले तेव्हा श्रीमहाराजांनी विचारले की कोणाला असे वाटते आहे की प्रवासात झालेला हा उशीर ही खरोखर नामस्मरणाला चांगली संधी मिळाली? कोणीच काही बोलले नाही तेव्हां माझ्याकडे पाहून श्रीमहाराज म्हणाले, आपण लोकांना सांगता (निरूपण करता) तेव्हा सोंग म्हणून तरी म्हणावे मला वाटले म्हणून! मी गप्प राहिलो पण ह्या प्रसंगावरून अनुसंधान म्हणजे काय व आपण किती कमी पडतो हे जाणवले.

|१११| (८ डिसेंबर १९८९)

**पू. बाबा** : श्रद्धा तीन कारणांमुळे निर्माण होऊ शकते व वाढू शकते. १) अनुभव २) भावना आणि ३) विचार.

तथापि आपण पाहतो की श्रीमहाराज करतात असा अनुभव आपल्यापैकी पुष्कळांना येऊनही श्रद्धा बळकट होत नाही. ते तात्पुरते होते. भावना निर्माण होणे अवघड असते. विचाराचा मार्ग कृष्णमूर्तीसारख्यांचा. त्यांनी गुरु केला नाही. केवळ विचाराने त्यांना आत्मज्ञान झाले.

ह्या अडचणी लक्षात घेऊन संतांनी ह्या तीन्हीचे मिश्रण केले. श्री. कृष्णप्रेम यांच्याजवळची श्रीकृष्णांची मूर्ती पाहून रमण महर्षींच्या देखील डोळ्यांत पाणी आले! विश्वास किंवा श्रद्धा असणे ही और चीज आहे. T. H. Huxley हा निरीश्वरवादी होता, तरीदेखील रविवारी चर्चमध्ये जात असे. याचे कारण विचारल्यावर तो म्हणाला, तेथे जो पाद्री उपदेश करतो ते ऐकून व पाहून मला बरे वाटते. It is so refershing to see a man having belief !

श्री. आण्णासाहेब मनोहरांना काशीला गेले असतांना तेथेच अर्धांगाचा झटका आला. त्यांच्या दोन्ही मुली त्यांची शुश्रूषा करीत असत. मीही श्री. भाऊसाहेबांबरोबर मुक्कामावर घरीच रहात असे. एक दिवस पू. तात्यासाहेबांनी श्री. आण्णासाहेबांना विचारले की येथे येऊन तुम्ही आजारी झालात, तेव्हां श्रीमहाराजांनी असे कसे केले असे नाही कां तुम्हांला वाटत? प्रश्न ऐकून ते रडू लागले. आवेग आवरून थोड्या वेळाने म्हणाले, माझे हृदय फाडून तुम्हाला दाखवता येत नाही; पण असा पुसट विचार देखील माझ्या मनाला शिवला नाही. उत्तर ऐकून पू. तात्यासाहेब मला म्हणाले, 'पहा कशा निष्ठेची माणसे असतात!'

श्रद्धा का निर्माण होत नाही यावर मी विचार केला. मुख्यत: मी पणामुळे श्रद्धा निर्माण होत नाही.

**साधक प** : पण ही श्रद्धा 'मीच' निर्माण करायची आहे. भजन, पूजन, नामस्मरण यांच्या सहाय्याने श्रद्धा वाढेल. आपल्यामध्ये श्रद्धेचे बीज आहे.

**पू. बाबा** : श्रद्धेने नाम घेतले तर लवकर काम होते. केवळ बुद्धीने आत्मदर्शन करून घेऊ म्हटले तर ते आपल्याला शक्य नाही.

**साधक ड** : श्रीमहाराजांनीच म्हटले आहे की 'मुलाला बापाचे बारसे

पहाता येणे शक्य नाही तसे मी कोण हे बुद्धीने समजणे शक्य नाही' म्हणून श्रद्धाच पाहिजे.

**पू. बाबा** : गीतेने श्रद्धेने महत्व सांगितले आहे. 'यो य: श्रद्ध: स एव स:।' उपनिषदांनीही गुरूकडे श्रद्धासंपन्न होऊन (श्रद्धावित्तो भूत्वा) जावे असे सांगितले आहे.

प्रेममार्ग देखील सोपा नाही. कबीर म्हणतात :

प्रेम का मारग बांका रे॥ धृ॥
वह जानत है प्रेम भयो शीश प्रेम में अर्पण जाका रे॥
यह तो घर है प्रेम का, खालाका घर नांहि।
शीश काट चरणन धरै, तब पैठे घरमांहि॥
प्रेम न बाडी उपजै, प्रेम न हाट बिकाय।
राजा रानी जो चहै सिर कांटे लै जाय॥

## ।११२। (१३ डिसेंबर १९८९)

मुक्काम गोंदवले. श्रीमहाराजांच्या पुण्यतिथी उत्सवाचा पहिला दिवस. सकाळ. पू. बाबांची खोली.

पू. बाबांना भेटावयाला एक गृहस्थ आले होते त्यांना पू. बाबांनी विचारले, तुमच्या डिपार्टमेंटमधे लोक पैसे खातात का? ते हो म्हणाले तेव्हां पू. बाबा म्हणाले की आपण तसे करू नये. मागू नये व कोणी दिल्यास ते आपले समजू नये आणि घरी आणू नये. आपल्याला पैशाचा फार आधार वाटतो; ते चूक आहे. आम्हाला व्हेकेशन्स मिळत. एकदा श्रीमहाराजांनी विचारले की व्हेकेशनचा पगार मिळतो ना? मी हो म्हणालो तेव्हा ते म्हणाले की काम न करता मिळालेला पैसा हा आपला नव्हे. त्याचा मोबदला म्हणून विद्यार्थ्यांना मोफत शिकवावे किंवा तो पैसा दानात खर्च करावा. मोबदला दिल्याशिवाय पैसा घेणे हे योग्य नाही. तें नीतीला धरून नाही.

येथे एकदा काही अन्न वाया गेले तेव्हां श्री. आण्णासाहेब (गाडगीळ) मला म्हणाले की इथे लोक जो पैसा अर्पण करतात तो सर्वच कष्टाचा आणि सदिच्छेचा असत नाही, म्हणून श्रीमहाराज त्याचा असा विनियोग करतात.

पू. बाबांनी पू. तात्यासाहेबांच्या दोन आठवणी सांगितल्या.

१) पू. तात्यासाहेबांना देहाचे चोचले आवडत नसत. एका दिवाळीत लोकांनी त्यांना तेल लावून स्नान घालायचे ठरविले तेव्हां त्यांचा डोळा चुकवून ते माडीवर पू. बाबांकडे जाऊन आंघोळ करून मग खाली गेले.

२) एकदा पू. तात्यासाहेबांना श्री. हुच्चूराव मालीश करीत होते. ते पाहून मनात विचार आला की पाहा, हे आपल्या देहाचे कसे कौतुक करून घेत आहेत. पू. तात्यासाहेबांनी हे ओळखले आणि मला म्हणाले, मला पेटीवर १०-१० तास बसावे लागते. आता हा देह श्रीमहाराजांचा आहे, त्यांच्यासाठीच सांभाळायचा आहे म्हणून ही काळजी!

इतर चर्चा चालू असतांना पू. बाबा म्हणाले, मनाची समजूत घालण्यासाठी दोन मार्ग आहेत. १) प्रारब्धाने जे घडायचे असेल ते घडेल. २) श्रीमहाराजांच्या इच्छेने जे घडायचे असेल ते घडेल, या दोहोंपैकी दुसरा मार्ग आपल्याला शक्य आहे कारण सर्व काही प्रारब्धावर सोपवून स्वस्थ राहावयासाठी लागणारी मनाची ताकत आपल्याजवळ नाही. आपण आपले सर्व काही श्रीमहाराजांवर सोपवावे आणि आपण माझ्याजवळ राहा अशी त्यांची प्रार्थना करावी. प्रार्थना करणे हाच मार्ग आपल्यासाठी आहे. गोपी आपला देह श्रीकृष्णाची त्याच्यावर मालकी आहे म्हणून सांभाळीत तसे महाराजांच्या सेवेसाठी आपला देह सांभाळावा.

नंतर पू. बाबांनी शरणागती व खरा अर्पणभाव म्हणजे काय ते श्री. भाऊसाहेबांकडून शिकावे असे सांगितले.

## |११३| (१५ डिसेंबर १९८९)

मुक्काम गोंदवले. पुण्यतिथी उत्सवाचा तिसरा दिवस. संध्याकाळी पू. बाबांची खोली.

**पू. बाबा :** श्रीमहाराज गोपाळकृष्णाची गोष्ट सांगत. लोणी चोरल्यावर बाळकृष्ण थोडे लोणी एखाद्या वांड वासराच्या नाकाला लावीत. त्यामुळे त्या वासराला चोप मिळे. तसे खरे परमात्माच सर्व करतो पण अहंकारी माणसाच्या नाकाला लोणी लावतो व त्यामुळे त्याला दु:ख भोगावे लागते.

परमात्म्याची व आपली ओळख नाही त्यामुळे उपासना करता येत नाही असे म्हणणाऱ्यांना श्रीमहाराज एक उदाहरण देत. त्यांनी पू. बाबांना विचारले की सध्या मुंबईचा कलेक्टर कोण आहे? ते म्हणाले मला माहीत नाही. त्यावर श्रीमहाराज म्हणाले, तथापि कलेक्टर मुंबई ह्या नावाने पत्र लिहून पोस्टात

टाकले तर ते त्याला मिळेल की नाही? त्याप्रमाणे आज भगवंताची ओळख नसली तरी उपासना करता येते आणि ती त्याला पोचते.

## |११४| (१६ डिसेंबर १९८९)

मुक्काम गोंदवले. पुण्यतिथी उत्सवाचा चौथा दिवस. संध्याकाळी पू. बाबांची खोली.

**पू. बाबा** : परमार्थाला सोपा उपाय म्हणजे सद्गुरूंना आवडते ते करणे, त्यांना शरण जाणे आणि ते आपल्या जवळ आहेत ही भावना वाढवणे. आपला निश्चय कमी पडतो व त्यामुळे प्रगती होत नाही. आता उडी घेतली पाहिजे आणि त्याची तर भीती वाटते. ही भीती घालवण्यासाठी संतांची वचने आणि पदांचे चिंतन करावे. ते उपयोगी पडते असा माझा अनुभव आहे. कबीराचे 'मन लागो यार फकीरीमें' हे पद बरेच दिवस माझ्या मनात घोळत होते आणि त्याचा मला फायदा झाला. पुढे जाण्यासाठी प्रेम आणि विचार दोन्ही पाहिजे.

**साधक प** : प्रापंचिक विचार आणि विकार यांच्याकडे उपेक्षेने पाहिले तर ते कमी होतील आणि नाम वाढेल.

**पू. बाबा** : पाच मिनिटे का होईना, इतर सर्व काम आणि विचार बाजूला ठेवून निश्चयाने सर्व लक्ष नामाकडे देता आले पाहिजे, म्हणजे मग नामस्मरणात थोडा हुकमीपणा येईल. तसेच आपल्या आड काय येते हे सावधानतेने पहावे म्हणजे मग ते बाजूला काढण्यासाठी उपाय सुचेल. थोडक्यात 'मला ते पाहिजे' ही तळमळ हवी. आज त्याचा अभाव आहे. ही तळमळ निर्माण होण्यासाठी सत्संगती हाच उपाय आहे. सज्जन तुम्हाला मदत करू शकतात. ते तुमचे विकार बाजूला करतील पण तुम्हाला ते सहन झाले पाहिजे. विकार आपल्या अंगभूत झालेले असल्याने ते निघतांना फार त्रास होतो; ती तयारी हळूहळू होईल. पण आज साधनात एक किमान पातळी यावयास हवी. मागे जाऊ नये; पाऊल पुढेच पडले पाहिजे. आता साधनाच्याच मागे लागले पाहिजे. नामाच्या आड येणारे विचार खरें वाटतात म्हणून ते खरें असले तरी मला सुखाचे होणार नाहीत. मला नामाशिवाय दुसरे कशानेही सुख मिळणार नाही असे मनापासून वाटू लागले तर मन नामात रंगू लागेल. बहिर्मुखी निश्चय सोपा असतो पण अंतर्मुख व्हावयाचा निश्चय कठीण आहे. अशा निश्चयाच्या आड आपणच येत असतो. वास्तविक जगात आपल्यावाचून काहीच अडत नाही.

म्हणून जगाची फारशी पर्वा करण्यात अर्थ नाही. श्रीमहाराज म्हणत की जे नामाच्या आड येते त्याची पर्वा करू नये. आता मनाशी सरळ-समोरून युद्ध केले पाहिजे.

## |११५| (१७ डिसेंबर १९८९)

मुक्काम गोंदवले. पुण्यतिथी उत्सवाचा पाचवा दिवस. संध्याकाळी पू. बाबांची खोली.

**पू. बाबा** : पू. तात्यासाहेब पेटीवर बसल्यावर प्रथम 'श' ह्या अक्षरावर बोट ठेवायचे. माझ्या हे लक्षात आल्यावर व मी त्यांना याचे कारण विचारले तेव्हां ते म्हणाले, त्याचा अर्थ मी शरण आहे असा आहे. हे (पेटीवर बसणे) श्रीमहाराजांनी सांगितले आहे म्हणून मी करतो. प्रथमच शरण जावे हे चांगले. नंतर ह्याबद्दल मी श्रीमहाराजांना विचारले तेव्हां ते म्हणाले, 'शंभर वेळा माणूस शरण आहे, शरण आहे असे म्हणाला तर एकदा तरी तो भाव येईल'.

एका गृहस्थांच्या पत्नीला Schizophrenia (दुभंगलेले व्यक्तित्व) झाला होता. ॲटॅक आला की कधी कधी स्वत:च्या तान्ह्या मुलाला खिडकीबाहेर फेकून देण्याच्या गोष्टी करी, त्यामुळे ते फार त्रासले होते. त्यांनी ही गोष्टी श्रीमहाराजांच्या कानावर घातली तेव्हां श्रीमहाराज म्हणाले की आपण प्रपंच खेळासारखा मानावा. त्या मुलाचे प्रारब्ध तसे असेल तर तेच घडेल आणि तसे नसेल तर फेकून दिल्यावरही कोणी त्याला वरच्यावर झेलून धरील. आपण घाबरू नका; राम सांभाळील. पुढे त्या बाईंचा आजार कमी झाला व त्या गृहस्थांचा संसार नीट झाला.

पू. बाबांनी विचारले की आपली साधनात प्रगती का होत नाही? काय अडते? साधकाने हे शोधले पाहिजे. त्याने आत्मपरीक्षण केलेच पाहिजे, म्हणजे कोठे अडते हे त्याला कळेल. तथापि हे करण्यासाठी देखील निश्चय आणि तळमळ पाहिजे.

लौकिक गुरु आपल्याला जितके खरें वाटतात तितके आपले सद्गुरु खरें का वाटत नाहीत?

**साधक ग** : लौकिक गुरु आपल्याच dimension मध्ये असतात आणि आपले सद्गुरु आता दुसऱ्या dimension मध्ये आहेत त्यामुळे त्यांची ओळख पटणे कठीण जाते.

**पू. बाबा** : हे काहीसे बरोबर आहे. काहीसे अशासाठी की श्रीमहाराज

देहात होते तेव्हां त्यांच्याजवळ असणाऱ्या किती लोकांनी त्यांना खरें ओळखले? काही असो, निष्ठा वाढली पाहिजे. सद्गुरूंकडे जर खरोखर मनापासून प्रार्थना केली की मी हा असा आहे. जितके साधन करता येईल तितके करतो; तर साधन वाढण्याच्या आड जे येते ते सद्गुरु दूर करतील. आज सकाळी प्रवचनासाठी घेतलेल्या 'भलतिया भावें' ह्या अभंगात तुकाराम महाराज म्हणतात की माझा वेडावाकडा, अपूर्ण व अस्थिर भाव असला तरी मी तुला शरण आहे. आता माझा अभिमान तू जाळ. इतर साधने, आणि क्षणभर वादासाठी **(for the sake of argument)** नाम राहिले तरी चालेल; पण मी तुझा आहे हा भाव आला पाहिजे. माझ्याकडे येणारे एक साधक लोकांना परमार्थ सांगत असत. त्यांचे गुरु त्यांना म्हणाले, तू प्रवचने वगैरे करावयाच्या भानगडीत पडू नकोस. तिकडे ते बेलसरे त्यासाठी आहेत. हे ऐकून त्यांना वैषम्य तर वाटले नाहीच. उलट माझे गुरु मला किती जपतात असे मनात येऊन त्यांच्याविषयीचे प्रेम व पूज्यभाव वाढला.

पू. तात्यासाहेब पेटीवर बसले की त्यांचा हात पेटीवर एकसारखा फिरत असे. त्यासंबंधी श्री. आण्णासाहेब घाणेकर यांनी श्रीमहाराजांना विचारले की यामुळे त्यांना पॅरेलिसिस तर होणार नाही ना? श्रीमहाराज म्हणाले, 'असे कां म्हणता? तो हातच त्याला हात देईल!'

## |११६| (१९ डिसेंबर १९८९)

मुक्काम गोंदवले. पुण्यतिथी उत्सवाचा सातवा दिवस. संध्याकाळी पू. बाबांची खोली.

**पू. बाबा** : आम्ही एकदा काशीला गेलो होतो तेव्हां सर्व मंडळी गांव पहायला गेली होती. मी गेलो नव्हतो. श्रीमहाराजांनी मला विचारले, तुम्ही नाही गेला? पुढे म्हणाले, तीर्थक्षेत्रात येऊन काय पहायचे असते? अशा ठिकाणी ज्या माणसाला भगवंताचे प्रेम आहे असा माणूस पहावयाचा असतो.

एका माणसाने श्रीमहाराजांना विचारले की ध्यान कसे करावे? श्रीमहाराज म्हणाले, जसे तहान लागल्यावर आपण पाणी पितो तसे. भगवंताचे किंवा सद्गुरूंचे रूप तसबिरीतून पुनःपुन्हा पहावे व ते आत स्थिर करण्याचा प्रयत्न करावा.

आज परत आपले ध्येय ठरलेले नाही व आपल्याला नामाची खरी आवड नाही असा विषय निघाला. शेवटी पू. बाबा म्हणाले की निर्गुण वगैरे जाऊ दे.

श्रीमहाराजांकडे पाहून हृदय भरून यावे इतके साधले तरी पुरे आहे. आनंदसागर असे होते. श्रीमहाराजांना नुसते पाहूनच त्यांच्या डोळ्यांतून अश्रुधारा वाहू लागत.

श्रीमहाराजांनी एकदा एका वकिलाची गोष्ट सांगितली. त्याने एका गरीब आणि दिसायला सामान्य असलेल्या मुलीशी लग्न केले. रात्री ती रडू लागली आणि म्हणाली की तुम्ही माझ्याशी लग्न केले खरें पण पैसा, रूप इत्यादी कोणत्याच गोष्टीत मी तुम्हाला लायक नाही. तो वकील म्हणाला की हे सगळे माहीत असूनही मी तुझ्याशी लग्न केले आहे ना? आता का त्याचे दुःख करतेस? ही गोष्ट सांगून नंतर श्रीमहाराज म्हणाले की त्या वकिलासारखी माझी अवस्था आहे. "मी तुम्हाला आपले म्हटले आहे. मग निराश व्हायचे काय कारण?"

## |११७| (२२ डिसेंबर १९८९)

मुक्काम गोंदवले. आज श्रीमहाराजांची शाहत्तरावी पुण्यतिथी. संध्याकाळी पू. बाबांची खोली.

पू. बाबांनी श्रीमहाराजांच्या अस्तित्वाची जाणीव का होत नाही व ती होण्यासाठी उपाय कोणता असा प्रश्न उपस्थित केला.

अस्तित्वाची जाणीव कोणत्या पातळीवर होईल ह्याबद्दल पू. बाबा म्हणाले की संत हे मानवी पातळीच्या वर ईश्वरत्वात जातात. आपल्याला तेथे संबंध जोडावा लागेल. तो जोडला जात नाही कारण १) आपणच आड येतो २) valuation झालेले नाही ३) ध्येय ठरलेले नाही.

बहुधा या तिन्हींपैकी एक प्रधान कारण असते व बाकीची दोन त्याबरोबर येतात.

यावर उपाय म्हणजे एकतर अभ्यास करून सद्गुरूंच्या अस्तित्वाची जाणीव प्रयत्नपूर्वक वाढवावी. दुसरे म्हणजे प्रार्थना करावी; किंवा मरणाचे स्मरण असावे म्हणजे साधनाबद्दल निकड निर्माण होईल. यापैकी काहीच जमत नसेल तर श्रीमहाराज सांगत त्याप्रमाणे हा जन्म नामाला वाहिला असे समजून प्रगतीकडे लक्ष देऊ नये. तथापि एकूणच सद्गुरूंच्या अस्तित्वाची जाणीव वाढणे आवश्यक आहे. ही जाणीव वाढणे म्हणजे आपल्या मानवतेच्या पलीकडे त्यांच्या ईश्वरत्वाची जाणीव झाली पाहिजे. संकटकाळी होणारी त्यांच्या अस्तित्वाची जाणीव ही खरी जाणीव नव्हे कारण संकट टळले

की ही जाणीव टिकत नाही. त्यांच्या अस्तित्वाची जाणीव होणे व ती टिकणे - सर्वकाळ टिकणे म्हणजेच उत्सव संपल्यावर श्रीमहाराजांना आपल्याबरोबर घेऊन जाणे होय.

संतांमधील देवत्व आणि मानवत्व यांतील सीमारेषेसंबंधी कोणीतरी विचारले तेव्हां पू. बाबा म्हणाले की तशी सीमारेषा दाखविता येणार नाही. संतांत देवत्व असते व मानवताही असते. संतांनाही विकार असतात पण ते विकार त्यांच्या ताब्यात असतात.

## |११८| (२३ डिसेंबर १९८९)

मुक्काम गोंदवले. पू. बाबांची खोली.

**पू. बाबा** : सर्वकाळ श्रीमहाराजांचे स्मरण ठेवले तर सर्व प्रश्न सुटतील. एकदा मी श्रीमहाराजांना विचारले की आपण शिक्षा का करीत नाही? यावर श्रीमहाराज म्हणाले की मला शिक्षा करताच येत नाही. शिक्षा करायला जे अंत:करण लागते ते माझ्यापाशी नाही.

पू. बाबा म्हणाले, शेवटी बुद्धी बाजूलाच ठेवावी लागेल. श्रीमहाराज आपल्याकडून योग्य तेच करवून घेत आहेत ही भावना असणे योग्यच आहे पण त्यात दोन प्रकारची सावधानता बाळगणे आवश्यक आहे. १) तामस प्रवृत्ती - आळस, झोप वाढू नये आणि २) श्रीमहाराज योग्य तेच करतात ही भावना परमार्थ आणि प्रपंच दोन्हीकडे सारखीच लावावी.

खरोखर श्रीमहाराजांनी आपल्याला किती सुखात ठेवले आहे. आपण किती कृतज्ञ असायला पाहिजे आणि किती साधन केले पाहिजे. सर्व परिस्थिती अनुकूल असूनही आपण काही करीत नाही. प्रकृतीच्या बाबतीत जसे आपण संवेदनशील (sensetive) असतो, थोडासा बिघाड झाला तरी समजतो तसे वृत्तीत बिघाड झाला तर कळले पाहिजे.

## |११९| (२९ डिसेंबर १९८९)

मालाडला पू. बाबांच्या घरी.

पू. बाबांच्याकडे नुकतेच एक सिंधी व्यापारी आले होते. ते बरेचदा जे. कृष्णमूर्तींना भेटले होते त्यासंबंधी त्यांनी पू. बाबांना सांगितले.

त्या व्यापाऱ्यांनी कृष्णमूर्तींना विचारले की तुम्ही नामस्मरण का मान्य करीत नाही? कृष्णमूर्ती म्हणाले की लोक सगुणाच्या भ्रामक कल्पनांमध्ये

गुरफटून जातात आणि खरें नामस्मरण Divine Name होत नाही. ते कसे घ्यावे म्हणून विचारल्यावर म्हणाले you must pray with ever increasing intensity. यावर त्या व्यापाऱ्यांनी विचारले pray whom ? निर्गुणाची प्रार्थना कशी करणार? तेव्हां कृष्णमूर्ती फक्त हसले. नामस्मरणाचा मार्ग खरा नाही का? आत्तापर्यंत त्या मार्गाने जाऊन जे पोहोचले त्यांचा तो भ्रम होता का असे विचारल्यावर कृष्णमूर्ती म्हणाले, तसे नव्हे; उदाहरणार्थ, रामकृष्ण परमहंस त्या मार्गाने पोहोचले होते. पण नामस्मरणाच्या नांवाखाली बरेचदा जे चालते ते भ्रष्ट स्वरूप असते. शुद्ध नामस्मरण होत नाही.

पू. बाबा म्हणाले, कृष्णमूर्तींसंबंधी श्रीमहाराज म्हणत की हा माणूस फार चांगला आहे. ज्या लोकांना ते सांगतात त्यांना पटेल अशा प्रकारेच ते सांगत आहेत. वास्तविक त्यात वेगळे असे काही नाही. ते गुरु मानू नका म्हणून सांगतात असे कोणीतरी एकदा श्रीमहाराजांना म्हणाले तेव्हां श्रीमहाराज हसले आणि म्हणाले, त्यांचे हे म्हणणे तुम्हाला पटले व त्याप्रमाणें तुम्ही वागू लागलात तर तेच तुमचे गुरु!



प्रा. के. वि. बेलसरे

अध्यात्मविषयक लेखनाप्रमाणेच पू. बाबांना अध्यात्मविषयक चर्चेचीही आवड होती. चर्चेत भाग घेणाऱ्या साधकांकडूनच त्यांनी विचारलेल्या प्रश्नांची वा शंकांची उत्तरे मिळावी अशा कुशलतेने ते चर्चेचे सूत्रसंचालन करीत असत. निव्वळ बौद्धिक कसरतीचा त्यांना तिटकारा होता. चर्चेतून साधकांच्या अध्यात्मविषयक संकल्पना स्पष्ट व्हाव्या आणि साधनात त्यांची प्रगती व्हावी अशी त्यांना तळमळ होती.